# जंजिरा संस्थानाचा
# इतिहास.

हें पुस्तक

**बाळाजी केशव भोंसले,**

ड्रॉइंग मास्तर, राजवाडा फुल शहर

यांनीं

तयार करून प्रसिद्ध केलें.



किंमत आठ आणे.



अली जनाब नवाब साहेब बहादुर शिद्दि अहमद खान
के. सी. आय. ई. संस्थान जंजिरा.

चित्रशाळा छा० छा०

# अर्पणपत्र.

माझे परमप्रिय जनक रा. रा. केशव रामाजी भोंसले; हे ता. ५ ज्यानुआरी सन १९०१ रोजीं स्वर्गवासी झाले. त्यांच्या स्मरणार्थ हा लघु ग्रंथ त्यांच्या चरणीं अत्यादर पूर्वक अर्पण केला आहे.

पुत्र,

बाळाजी केशव भोंसले.

# प्रस्तावना.

इतिहास म्हणजे इतिवृत्त. मूळारंभापासून आजपर्यंत ज्या ज्या गोष्टी घडल्या त्या सर्वांचें टिपण ज्या ग्रंथांत केलेलें असतें, त्याचें नांव इतिहास.

प्रस्तावना लिहिण्याचा उद्देश हाच असतो कीं, वाचणारानें पुस्तक हातांत घेतल्याबरोबर यांत काय काय विषय आहेत, हें अगदीं थोडक्यांत समजावें, अशी इच्छा प्रत्येक वाचणारास असते. ती तृप्त व्हावी अशा हेतूनें ही प्रस्तावना लिहिली आहे. तेणेंकरून वाचणाराचा हेतु सफळ होईल यांत संशय नाहीं.

प्राचीनकाळाची स्थिति अवलोकन करण्याचीं साधनें म्हटलीं म्हणजे इतिहास व दंतकथा, कहाण्या, हीं कारणीभूत होत. इतिहास विषयावरून आपले पूर्वज कोणत्या प्रकारचे वीर पुरुष होते; व त्यांच्या अंगीं असलेलें सौंदर्याचें चित्र दृष्टीपुढें दाखविण्याचें साधन इतिहासासारखें दुसरें कोणतेंच नाहीं.

आपल्या महाराष्ट्रासंबंधानें पाहिलें तर जुन्या काळचे अनेक ऐतिहासिक कागदपत्रें दररोज नवीन उघडकीस येत असून, त्यांच्या योगानें पुष्कळ ऐतिहासिक गोष्टींचा समाधानकारक उलगडा होऊं लाग-

ला आहे. अशा स्थितींत एखाद्या संस्थानिक राजनिष्ठ भक्तानें इतिवृत्त माहितीचा उपयोग करून विस्तृतपणें लिहिलेल्या आधारभूत इतिहासाची आपल्या संस्थानच्या भाषेत मोठी जरूर होती, परंतु ती दूर करण्याची वेळ ईशकृपेनें मलाच दिली, सबब मी त्या जगनियंत्याचा आभारी आहे. अशा उद्देशानें प्रस्तुत पुस्तकाचा आरंभ केला आहे.

ह्या पुस्तकास "जंजिरा संस्थानचा इतिहास" हें नांव दिले आहे. यावरून त्यांत जंजिरा संस्थानासंबंधीं संपूर्ण माहिती असणें अवश्य आहे. ह्मणजे ज्या काळाचा हा इतिहास लिहिला आहे, त्याकाळीं शिद्दी (हबशी) लोकांची स्थिति कशी होती; या लोकांत विद्या व ज्ञान ह्यांचा प्रसार कितपत होता; त्यांच्यामध्यें कारागीर व कवी आणि तत्ववेत्ते कोण निपजले, व त्यांच्या उद्योगाचा जनसमूहावर काय परिणाम झाला; इत्यादि गोष्टींचा उल्लेख या पुस्तकांत केला आहे.

शिद्दी "अरब ऐल हबशी" लोक हिंदुस्थानांत प्रथम येण्याचें कारण व ते कसे आले व त्यांनीं येऊन येथें कोणकोणती बहादुरी करून राज्य स्थापन केलें, वगैरेची पूर्ण माहिती दिली आहे.

प्रस्तुत पुस्तक लिहितांना ज्या ज्या पुस्तकांची व सद्गृहस्थांची मी मदत घेतली आहे त्या त्या पुस्तकांच्या कर्त्यांचा मी फार आभारी आहे. हे पुस्तक प्रसिद्ध करण्याच्या कामीं माझे पुज्य स्नेही रा. सा. दामोदर सांवळाराम यंदे, श्री सयाजी विजय पत्राचे मालक व चालक यांजकडून मिळालेल्या साह्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे.

ह्या पुस्तकाची भाषा सरळ व सोपी करण्याबद्दल मजकडून झाले तेवढे प्रयत्न मी केले आहेत; आणि हंसक्षीर न्यायानें सूज्ञ वाचक यांतील गुणांचें सेवन करतील अशी आशा आहे.

मु. मुरुड जंजिरा—फुल शहर राजवाडा, आश्विन विजय १० मी, शके १८२० हेम्लंबसंवत्सरे. तारीख २४ आक्टोबर सन १८९८.

बाळाजी केशव भोंसले.

# उपोद्घात.

जगांत इतिहास व भूगोल या विषयासारखा दुसरा त्कृष्ट विषय नाहीं. कारण इतिहासावरून राष्ट्रांतले ाक पूर्वी कसे होते व हल्लीं कसे आहेत, याचें दिग्दर्शन होतें. त्या वेळेचें कलाकौशल्य व विद्या कोठपर्यंत होती, व राज्यकर्ते कोणत्या स्थितींत असत, वगैरे इतिहासग्रंथाधारें कळून येतें. त्याचप्रमाणें भूगोल या विषयावरून देशांची रचना व धातु वगैरे स्पष्ट दाखवीत आहे.

जंजिरा संस्थान कोंकण प्रांतांत मुंबई बेटाच्या दक्षिण बाजूला सुमारें २१ मैलावर दंडाराजपुरी नांवाच्या विशाळ खाडींत "किल्ले महरूब ऊर्फ जंजिरा" नांवाचा किल्ला आहे. सतराव्या शतकांत या खाडींत व्यापार भरभराटींत होता, असें इतिहासप्रसिद्ध आहे.

जंजिरा किल्ल्याच्या तटासभोंवती समुद्राचें पाणी असल्या कारणानें हें बेट अती रमणीय दिसतें. या बेटाची वस्ती खडकावर वसविलेली आहे. ओहट

---

१ यास रत्नागर सागर असेंही म्हणतात. कारण या प्रांतांत रत्नागिरी नांवाचें शहर आहे.

असला म्हणजे ज्या लाकडावर किल्ल्याचा कोट बांध-ण्यांत आला आहे, तो थोडासा उघडा पडतो; कोटाच्या भिंतीची उंची सुमारें १० फूट असून प्रत्येक बुरजांमध्यें अंतर नव्वद फुटांचें राखलेलें आहे.

राजपुरीच्या किनाऱ्यापासून किल्ल्यांत आण्या-येण्याकरितां नेहमीं तर चालू असते. कारण किल्ल्यांत हिंदु आणि मुसलमान लोकांची वसाहत आहे. सदरहु रहिवाशांपैकीं कोणी मनुष्य मृत्युमुखीं पडल्यास त्याचें प्रेत होडींत घालून राजपुरीच्या किनाऱ्यावर आणलें जातें.

किल्ल्यांत राजवाडा आहे. त्याचप्रमाणें दोन गोड्या पाण्याचीं तळीं असून फरसबंदी रस्ते आहेत. तोफखाना, दारुगोळा, करण्याच्या जागा फार वि-चित्र आहेत.

किल्ल्याचा देखावा.—चित्रविद्येच्या नियमाप्रमाणें घरें एकावर एक चढतीं दिसतात. समुद्रपृष्ठापासून ह्या टेकाडाची उंची दोनशें फूट आहे. पश्चिमेस आरबीसमुद्र पसरलेला आहे व तिन्ही बाजूनें रमणीय पहाडांचे देखावे दृष्टीस आनंद करीत आहेत.

---

१ किल्ल्यास समुद्रदुर्ग म्हणतात.

किल्ल्यांत बहुतेक रहिवाशी सनदी आहेत. हल्लींचे नामदारसाहेब मात्र स्वतः मुरुड गांवाजवळ फुलशहरीं नेहमीं रहातात. कामकाजानिमीत्त किल्ल्यांत जाणें येणें मात्र असतें. पूर्वीप्रमाणेंच दरबार वगैरे थाट असून रात्रीं आठ वाजण्याचे अंमलांत किल्ल्याचा दरवाजा बंद होतो, व ताबूताचें जाळीकाम "क्रियात्मक भूमितीच्या" नियमाप्रमाणें उत्तम असून कशीद्याचें कामही होतें.

हबसाण जंजिऱ्याचें क्षेत्रफळ ३२४ तीनशें चोवीस चौरसमैल जमीन आहे. त्यामध्यें वस्ती सुमारें पाऊण लाख मनुष्यांची आहे. याचें वार्षिक उत्पन्न पांच लाख रुपयांचें आहे. हपसाणचे राज्यकर्ते नामदार नबाब साहेब बहादुर शिद्दी आमदखान के. सी. आय. ई. हे आहेत, यांस इंग्रज सरकारांतून नऊ तोफांचा मान आहे. हें राज्य केसरे हिंद महाराणीच्या रक्षणांत आहे. त्याचप्रमाणें यावर कोणत्याही प्रकारची खंडणी नाहीं.

**बाळाजी केशव भोंसले.**

---

२ वंशपरंपरा मुशारा मिळणें म्हणजे वार्षीक पगार आहे.

श्री.

# जंजिरा संस्थानाचा इतिहास.

## भाग १ ला.

१ संस्थानाचें क्षेत्रफळ. २ लोकसंख्या.
३ संस्थानाच्या ताब्यांतील गांवें व शहरें. ४ संस्थानाच्या ताब्यांतील नद्या, डोंगर, कायदेकानू.
५ लोकरिवाज, व्यापाराच्या वस्तु. ६ प्रेक्षणीय स्थळें.

**जंजिरा** हें लहानसें संस्थान कोंकणपट्टींत मुंबई बेटांच्या दक्षिण दिशेला सुमारें २६ मैलांवर आहे. या संस्थानाचें क्षेत्रफळ ३२४ तीनशें चौवीस चौरस मैल जमीन आहे. याची हद्द नकाशांत दिली आहे. हा नकाशा समोर धरला असतां डावे बाजूला आरबी समुद्र आहे असा काढला आहे.

या संस्थानाच्या उत्तरेस **रोह्याची** खाडी (कुंडलिका नदी), दक्षिणेस **बाणकोटची** खाडी (सावित्री नदी), पूर्वेस सह्याद्री पर्वत असून **लाहीवट, वागणी गोईला, मानगांव** तालुका व **कुलाबा** जिल्हा आहे. आणि पश्चिमेस विस्तीर्ण **अरबी** समुद्र आहे.

या संस्थानांतील लोकसंख्या हिंदु, मुसलमान, जैन, ज्यू आदि मिळून इ. स. १८९१ च्या खानेसुमारीच्या वेळीं ८१,७८० होती.

या संस्थानाच्या ताब्यांत २८६ गांवें आहेत. त्यांत २३ गांवें इनामी आहेत. मुख्य शहरें श्रीवर्धन, म्हसले, मुरुड हीं प्रसिद्ध आहेत. यांसच तालुके असें ह्मणतात. त्यांचे पोटभाग नांदगांव, मांडले, बोरलीपंचतन, खामगांव वगैरे आहेत. त्यांची गणनाही साधारणतः शहरांत होते.

**नद्या.**—राजपुरीची खाडी विशाळ आहे, बाकीच्या साधारण आहेत. पर्जन्यकाळीं मात्र त्यांस पाणी असतें. बाराही महिने ज्यांस पाणी असतें अशा नद्या ह्मटल्या ह्मणजे गारबी, शीधारा व बाणगंगा ह्या होत. बाणगंगा हें तीर्थाचें स्थान आहे. बाणगंगेप्रमाणें दुसरींही तीर्थें आहेत. त्यांचें वर्णन दुसरीकडे दिलें आहे.

**डोंगर.**—हा मुलूख मुळचाच डोंगराळ आहे; आणि त्यास गांवांवरूनच नांवें पडलेलीं आहेत.

**कायदेकानू.**—हिंदुस्थान सरकारांनीं पास केलेलेच कायदेकानू या संस्थानांत चालत आहेत, संस्थानचे वेगळे कायदे ह्मणून नाहींत.

**न्यायकोर्टें.**—सरदार कोर्ट, शेशन जज्जकोर्ट, डिस्ट्रिक्ट माजिस्त्रेट कोर्ट, माजिस्त्रेट कोर्ट वर्ग १ ला, २ रा आणि तिसरा, अशीं फौजदारी कोर्टें आहेत.

शिवाय सरदार कोर्ट, सरन्यायाधीश कोर्ट आणि मुन्सफ कोर्ट अशीं दिवाणी कोर्टें आहेत

खातीं.–मुलकी, सरव्हे, लष्करी, पोलिस, इंजिनिअर, मेडिकल, वेटरनरी, अबकारी, कस्टम, फॉरेस्ट, स्टॅम्प, शाळा, लोकलबोर्ड, देवी, वाटरवर्क, इत्यादि मुख्य खातीं आहेत.

लोकरिवाज.–हिंदु व मुसलमान जे ते आपआपल्या धर्माप्रमाणें चालतात. प्रत्येकास आपल्या धर्माप्रमाणें वागण्याचें पूर्ण स्वातंत्र्य आहे व धर्म बाबतींत सरकार हात घालीत नाहीं.

व्यापाराच्या वस्तू.–येथें भात उत्तम होतो व नागली, वरी, हारीक, तूर, चणा, आवरे, तीळ, मूग, बटाटे, रताळीं, कांदा वगैरे मध्यम होतात. श्रीवर्धनी सुपारी जगप्रसिद्ध आहे. नारळ, केळीं, जळाऊ लांकडें, इमारती लांकडें, साग वगैरे जिनसाही येथें चांगल्या पिकतात.

जमीन बाबी.–ईनामी, कवली, धारेबंदी, खोती, (कुल) व खोती (हक) खालसा. येणेप्रमाणें जमिनीच्या बाबी आहेत.

पोष्ट.–सबपोष्ट ऑफिस मुरुड येथें असून ब्रांच पोष्ट ऑफिसें श्रीवर्धन, म्हसले, बोरली, पंचतन,

बोरली मांडले, मानगांव, हरेश्वर या ठिकाणीं आहेत. पोष्ट खात्याची सर्व व्यवस्था इंग्रज सरकाराकडून चालते. टेलिग्राफ आफिस व सब पोष्टऑफिस हीं आहेत.

प्रेक्षणीय स्थळें.—मुरूड येथील किल्ला पहाण्यासारखा आहे. हरेश्वर येथें जत्रा भरत असते, तसेंच नांदगांव येथें गणपतीचा उत्सव होत असतो. मुरूड येथें चैत्रीचा उत्सव चांगला होत असतो, त्या वेळेस देवीस रेडा बळी देण्यांत येतो.



# भाग २ रा.

## विषय मर्यादा.

१ हबशी लोकांचें मूळ घराणें. २ हबशी लोकांची वसाहत.
३ हबशी लोकांचें दळणवळण कसें वाढलें. ४ हबशी लोकांस जंजिरा संस्थान कसें मिळालें.

## हबशी लोकांची मूळ पिठिका.

**हबशी लोक हिंदुस्थानांत येण्याचीं कारणें**— प्राचीन काळापासून हिंदुस्थानचा व्यापार आफ्रिका खंडाशी चालू होता. त्या वेळीं हिंदुस्थानचा पश्चिम किनारा व बंगाल येथून मालानें भरलेलीं जाहाजें ईजिप्त देशाकडे जात असत आणि तेथून माल घेऊन परत येत असत. हा माल अलेक्झांड्रिया, समरकंद, वगैरे ठिकाणीं जाऊन तेथून सर्व युरोप खंडांत जात असे. व तेव्हांपासून युरोप खंडांतील कांहीं राष्ट्रांस हिंदुस्थानाशीं व्यापार करावा असें वाटूं लागलें; व व्हेनिशियन, जिनोईज आणि पोर्तुगीझ लोक हिंदुस्थानाकडे जलमार्गानें सफरी करूं लागले. परंतु हा मार्ग फार दूरचा व संकटाचा असल्यामुळें थोड्याशा फायद्यासाठीं इतक्या दूरचा व्यापार करणें त्यांस हितावह न वाटल्यामुळें पुढें त्यांनीं आप-

ला व्यापार बंद केला. आणि दक्षिणइराण व अरबस्थान येथील मुसलमान लोकांनीं हिंदुस्थानाशीं आपला व्यापार सुरू ठेवला. चवदाव्या शतकांत या लोकांशिवाय दुसऱ्या कोणत्याही लोकांचा हिंदुस्थानाशी व्यापार नव्हता.

आफ्रिका खंडांतील अबिसीनिया उर्फ हबस हा देश अरबस्थानच्या फार नजीक असल्यामुळें अरबी लोकांप्रमाणेंच हिंदुस्थानाशीं व्यापार करण्याची ह्या अबिसीनियन किंवा हबशी लोकांस इच्छा झाली. या पूर्वीं हबशी लोक हिंदुस्थानांत आल्याची माहिती कोठें मिळत नाहीं. आणि ज्या अर्थी ते ह्याच वेळीं इकडे आले. त्या अर्थी ते फक्त व्यापार करण्याकरितांच पहिल्यानें हिंदुस्थानांत आले असें उघड दिसतें.

हबशी लोकांचीं जीं जाहाजें त्यावेळीं हिंदुस्थानाकडे येत असत तीं पश्चिम किनाऱ्याकडे व बंगाल्याकडे जात असत. त्यावेळीं दक्षिण हिंदुस्थानांत ब्राह्मणी राजे राज्य करीत होते. हबशी लोक जरी पहिल्यानें व्यापार करण्याकरितां हिंदुस्थानांत आले होते तरी, पुढें पोर्तुगीझ लोकांनीं हिंदुस्थान देशाशी व्यापार आरंभिल्यामुळें यांचा व्यापार बंद पडला व हे लोक ब्राह्मणी राज्याच्या लष्करांत नो-

करीत राहिले. हवशी लोक जास्या शूर व मद्द असल्यानें ते लोकरच प्रसिद्धीस आले, आणि नोकरीच्या संबंधानें पुढे यांचे लोक हिंदुस्थानांत जास्त येऊं लागले, त्यामुळें त्यांची संख्या बरीच वाढली. अशा प्रकारें यांची वसाहत हिंदुस्थानांत वाढल्यावर त्यांचे विवाहसंबंधही येथील मुसलमान स्त्रियांशीं होऊं लागले व त्यामुळें यांचा वर्ण जरी मूळचा अगदीं काळा होता तरी यांची संतती हिंदुस्थानांतील मुसलमानांच्या वर्णाप्रमाणें झाली. हे लोक आपल्या देशांत जरी अगदीं रानटी स्थितींत होते, तरी इकडे आल्यानंतर ते इतक्या योग्यतेस चढले कीं, त्यांच्या पैकीं कोणी वजीर, कोणी सेनापती, कोणी नौकासेनापती, वगैरे होऊन ते राज्यकारभारांतही इराणी लोकापेक्षां जास्त प्रविण झाले. अहमदनगरचा मुख्य वजीर मलिकंबर हा हवशी होता. तो जिवंत होता तोंपर्यंत त्यानें निजामशाहीचें मोंगलांच्या स्वाऱ्यापासून चांगलें संरक्षण करून कित्येक वेळा त्यांचा पराभवही केला. तो फार धूर्त व साहसी पुरुष होता; त्याच्यावर लोकांची भक्ति फार होती; त्याच्या मरणानंतर अहमदनगरचें राज्य लोकरच मोडकळीस आलें.

## वजीर मलिकंबर याचा संक्षिप्त वृत्तांत.

मलिकंबर हा जातीचा हबशी उर्फ शिद्दी असून पहिल्या मुर्तजा निजामशहाचा इमानी दिवाण जो चंगीजखान त्याजपाशीं नोकरीस होता. राज्यकारभाराच्या कामांत तो फार तरबेज झाला होता. अहंमदनगर मोंगलांच्या ताब्यांत गेल्यावर दौलताबादेपासून सहा मैलांवर खडकी नामक शहरीं मोठमोठ्या हवेल्या बांधून तेथें त्यानें निजामशाहीची राजधानी केली; व त्या ठिकाणीं राहून मलिकंबर सर्व राज्यकारभार पहात असे. ह्याच शहरास पुढें औरंगजेबानें औरंगाबाद असें नांव दिलें. मलिकंबराच्या पदरीं पुष्कळ मराठे सरदार होते. सिंदखेडचे देशमुख, जाधवराव, व मालोजी भोंसले हे सरदार पूर्वींपासून निजामशाहींत होते. अहंमदनगर व विजापूर ह्या दोन ठिकाणीं लष्करी खात्यांत पुष्कळ मराठे सरदार ह्या वेळेस उदयास आले.

अकबर बादशहा आणखी कांहीं वर्षें वांचता, तर निजामशाही साफ बुडाली असती. पण जहांगीर गादीवर बसण्याच्या घालमेलींत मलिकंबरानें, फौज जमा करून निजामशाहीचा मुलख परत घेतला. अहंमदनगर हस्तगत केलें व मोंगल सरदारांस घाल-

धून दिलें. इतकें झाल्यावर तो देशस्थिति सुधारण्याच्या कामास लागला. त्यांत त्यास इतकें यश आलें कीं, त्याचें नांव दक्षिणेंतील लोकांच्या तोंडून अद्यापि निघतें. त्यानें निजामशाहींतील जमिनीची मोजणी करून सरकारसाऱ्याचे दर ठरविले, व उत्तरेंतील तोडरमल्लाची पद्धत दक्षिणेंत सुरू केली. ह्या कामीं कित्येक मराठे सरदाराची त्यास चांगली मदत होती. साबाजी, आनंदराव, शिवाजीपंत मुत्सद्दी, व सखाराम मोकाशी वगैरे कित्येक गृहस्थ त्याचे मदतगार होते. उत्तर हिंदुस्थानांत तोडरमल्लाची ख्याती आहे, त्याचप्रमाणें दक्षिण हिंदुस्थानांत मलिकंबराची आहे. इजाऱ्यानें जमिनी देण्याची चाल त्यानें अगदीं बंद केली व वसुलाचें काम ब्राह्मण कारकुनांच्या हातीं दिलें. सर्व शेतांची मापणी व पाहणी करून मागील कित्येक वर्षांच्या उत्पन्नाची सरासरी काढून प्रत्येक शेतावर सरकारचें नक्त देणें ठरविलें, व तें पिकाच्या मानानें कमीजास्त देण्याची सवड ठेविली; आणि कांहीं वर्षें लोकांस साऱ्याची माफी देऊन नवीन जमिनी लागवडीस आणिल्या. ह्या गोष्टींमुळें अंमलदारांचा रयतेवर होत असलेला जुलूम नाहींसा झाला व देशांत सर्वत्र आबादानी झाली. मलिकंबर फार खर्चिक असे; तरी नियमित

वेळीं वसूल येत असल्यानें त्याची खर्चाच्या कामीं कधीं ओढाताण होत नसे. मलिकंबरानें देशांत इतकी स्वस्थता केली कीं, लवकरच मोंगलाशीं टक्कर देण्यास तो समर्थ झाला.

जहांगीर बादशहानें निजामशाहीचा मुलूख घेण्यासाठीं मोठमोठ्या फौजा रवाना केल्या. त्यांत गुजराथचा मोंगल सुभेदार अबदुल्लाखान हा दिल्लीची फौज येण्यापूर्वीं एकटाच मलिकंबरावर चालून गेल्यामुळें, त्याचा मलिकंबरानें चांगलाच समाचार घेतला. मलिकंबराची लढण्याची पद्धत थेट माराठ्यांसारखी होती. समोरासमोर सामना न करितां आड राहून तो शत्रूंस जेरीस आणी. इ० स० १६१७ सालीं जहांगीर आपला मुलगा शहाजहान यांस पुढें पाठवून आपणही निजामशाही जिंकण्याकरिता चालून आला. शहाजहानानें विजापूरच्या राजास व कित्येक मराठे सरदारांस मलिकंबराचे कटांतून फोडिलें, तेव्हां निरुपाय होऊन मलिकंबर शहाजनास शरण गेला, व त्यानें अहंमदनगर व सभोंवतालचा प्रांत मोंगलास दिला. पुढें शहाजहान काश्मिराकडे गेल्यावर मलिकंबरानें पुनः मोंगली फौजेस हांकून देऊन आपले प्रांत परत घेतले. हें ऐकून शहाजहान पुनः दक्षिणेंत आला, व मलिकं-

राचा पराभव करून त्यानें ते प्रांत परत मिळविले. ह्यापुढें मलिकंबर मोंगलाशीं स्नेहानें वागला, व अशा रीतीनें त्यानें निजामशाहीचें होईल तितकें हित केलें. मोठमोठीं प्रजाहिताचीं कामें करून हा महान हबशी पुरुष इ० स० १६२६ सालीं मरण पावला. ह्यावेळीं त्याचें वय ८० वर्षांचें होतें. दौलताबादेस त्यानें एक मोठा घुमट बांधिला होता. तेथेंच त्याची कबर करण्यांत आली. त्याची जमाबंदीची पद्धति अद्याप दक्षिणच्या लोकांस पसंत आहे. त्याचें राज्यकारभाराचें चातुर्य, न्यायी वर्तन, ईश्वरभक्ति, औदार्य आणि शौर्य, या गुणांविषयीं दक्षिणेंत त्याची फार आख्या आहे. त्या संबंधांत जितकें लिहावें तितकें थोडें आहे.

हबशी लोकांपैकीं कांहीं लोक बंगाल व बहार प्रांतांत होते. तेथें फत्तेखान नांवाचा मुसलमान राजा राज्य करीत असतां त्यास एका गुलामानें ठार मारून इ० स० १४६१ सालीं त्याची गादी बळकाविली, परंतु त्याच वर्षीं अंदिल नांवाच्या एका हबशी सरदारानें त्यास गादीवरून काढून आपण फिरोजपूरबी या नांवानें गादीवर बसला. आणि इ० स० १४९१ मध्यें आपली राजधानी गाव्हर येथें मरण पावला. याचें राज्य फार भरभराटीचें होतें. त्याचा मुलगा महंमद त्याच्या मागून गादीवर ब-

सला, परंतु शिद्दी बद नांवाच्या एका हबशानें त्यास ठार मारून गादी बळकाविली. यानें फार दिवस गादीचा उपभोग घेतला नाहीं. थोड्या दिवसांतच तेथील बडे लोकांनीं बंड करून राजधानीवर हल्ला केला, त्यांत तो मारला गेला. नंतर सय्यद शरीद जो या बंडाचा मुख्य अधिकारी होता तो गादीवर बसला. त्यानें आपल्या लष्करातील सर्व हबशी शिपायांस काढून टाकिलें.

इ. स. १३४७ सालीं जाफरखानानें ब्राह्मणी राज्याची स्थापना केली, आणिं इ. स. १३९८ त आपल्या वयाच्या ६७ व्या वर्षीं तो मरण पावला. हें राज्य सुमारें १९० वर्षें पर्यंत एकाच घराण्याच्या अंमलाखालीं होतें या राज्यांत दक्षिणी आणिं परदेशी असे दोन पक्ष होते. परदेशीय पक्षांत मोंगल, इराणी, तुर्क व अरब हे लोक होते. आणि दक्षिणी पक्षाकडील लोकांची संख्या परदेशी पक्षाकडील लोकांपेक्षां जास्त होती. या दोन पक्षांकडील लोकात वैमनस्य आणि स्पर्धा इतकी वाढली होती कीं, यांच्या झटापटी होण्याचें नेहमीं प्रसंग येत. इ. स. १४९९ त ढाकणच्या किल्लेदारनाक दक्षिणी पक्षाकडील लोकांनीं पुष्कळ परदेशीय पक्षाकडील लोकांची कत्तल उडविली. ब्राह्मणी राज्याचा शेवट

होण्यास या दोन पक्षाकडील लोकांचें वैमनस्यच कारण होय. या राज्यांत हबशी लोक अजून राज्य-कारभाराचें काम चालविण्याच्या योग्यतेस आले नव्हते, तथापि हे लढाईत फार शूर होते. परदेशीय पक्षाचा पुढारी यूसुफ अदिलशहा हा होता. यानें-च पुढें इ. स. १४८९ मध्यें विजापूरची गादी स्थापन केली. दक्षिणी पक्षांचा पुढारी निजाम उ-ल्मुल्क होता. त्यानें आपले पक्षांकडील लोकांच्या मदतीनें ब्राह्मणी राज्याचा वजीर महंमद गवान हा इराणी असल्यामुळें, त्याचा नाश करण्याकरितां दुष्ट लोकांच्या साहाय्यानें एक गुप्त बेत केला. गवानाचा म-दतगार युसूफ आदिलशहा हा नरसिंह रायावर तैलंगणांत गेला आहे अशी संधि साधून, ते आपली मस-लत पार पाडण्याच्या कामास लागले. गवान हा पर-देशस्थ होता निजाम उल्मुल्क व इतर दक्षिणी व हबशी मंडळी त्याजवर उठलेली होती, या मंडळीनें ओढ्याच्या राजास महंमदशहा विरुद्ध लिहिलेलें ग-वानाच्या मोर्तबाचें असें एक बनावट पत्र तयार केलें व तें आपण रस्त्यांत पकडलें असें सांगून शहाच्या हातांत दिलें. शहा त्या वेळेस दारू पिऊन गुंग झालेला होता. त्यानें एकदम गवान यास आपल्या समोर आणवून अविचारानें ठार मारण्याचा हुकूम दिला. याप्रमाणें

इ. स. १४८१ मध्यें आपल्या वयाच्या ७८ वे वर्षी गवानाचा अंत झाला. महंमद गवान जरी इराणी होता, तरी दक्षिणी पक्षांस वाईट वाटण्यासारखें त्यानें कोणतेंही कृत्य केलें नव्हतें. त्यानें राज्यकारभार फार चांगल्या रीतीनें चालविला होता. मरतेवेळीं राजास उद्देशून तो ह्मणाला—"वृद्ध मनुष्याचा मृत्यु जरी फार महत्वाचा नाहीं, तरी पण यामुळें तुझी अपकीर्ति होऊन तुझ्या राज्याचा शेवट लवकरच होईल." प्रसिद्ध वजीर महंमद गवान मरण पावल्यावर ब्राह्मणी राज्य लवकरच मोडून त्याचीं निरनिराळीं पांच राज्यें झालीं.

निजाम उल्मुल्क बहिरी हा विजयानगरच्या* बहिरूपंत कुळकर्णी या नांवाच्या एका ब्राह्मणाचा मुलगा होता. त्याचें पूर्वीचें नांव तिमाप्पा किंवा तेमाभट होतें. तो दुष्काळांत आपल्या बापाबरोबर कर्नाटकांत गेला असतां तेथें अहंमदशहा वली बाहामनी

* विजयनगर शहराचा थोडासा घोंटाळा आहे. हल्लीं ज्यास विजयानगर ह्मणतात तें शहर राजमहेंद्रीच्या उत्तरेस पूर्व किनाऱ्यावर आहे. ब्राह्मणी राज्याच्या वेळेस ज्या ठिकाणीं प्रबळ हिंदुराज्य होतें, तें विजयनगर हल्लीं अस्तित्वांत नाहीं. बळारी नजीक हंपी ह्मणून जें गांव तुंगभद्रेच्या कांठीं आहे. तेथेंच विजय नगर होतें. श्री रामचंद्राच्या वेळचीं किष्किंधा नगरी ही तेथेंच आहे.

यांच्या स्वारांनीं त्यास कैद केलें, आणि अहंमदशाहाच्या स्वाधीन केलें. त्यानें त्यास मुसलमान करून त्याचें नांव मलिक हसन असें ठेविलें व त्यास आपल्या मुलाबरोबर अरबी आणि फारशी भाषा शिकविल्या. पुढें तो हजार स्वारांचा मुख्य झाला. इ. स. १८४२ मध्यें ब्राह्मणी राज्याची राजधानी बेदर येथें वजीर व राजा लहान असल्या कारणानें तो मुखत्यार झाला. त्यावेळीं युसूफ आदिलशहा तेथें नव्हता. तो थोड्या दिवसांनीं मोठें सैन्य घेऊन आला, तेव्हां निजाम उलमुल्कही मोठें सैन्य घेऊन त्यास भेटण्यास गेला. दोघांची भेट होऊन बाह्यात्कारी मैत्री झाली. निजाम उलमुल्कानें कांहीं पक्षपात न करितां दोन्ही पक्षांकडील लोकांस मोठमोठ्या अधिकारांवर नेमिलें. आदिलशहा, सेनापतीच्या अधिकाराशिवाय कोणताहि अधिकार स्विकारीना. तो अधिकार त्यास न मिळाल्यामुळें तो बेदर येथेंच राहिला. निजाम उल्मुल्कानें फार वाईट कृत्यें करून महंमद गवान याचा शेवट केला होता, तो सूड उगविण्याकरितां परदेशीय पक्षांचे लोक टपलेले होते. ह्या धास्तीमुळें निजाम उल्मुल्कानें आदिलशहाचें सैन्य गैरसावध आहे अशी संधी साधून त्यावर एकदम हल्ला केला, व पुष्कळ लोकांस ठार मारून सर्व सैन्याची दाणादाण

करून टाकिली. परंतु तें सैन्य पुन्हा जमून त्यानें निजाम उलमुल्काच्या सैन्याची कत्तल केली. नंतर बेदरचे लोक मध्यस्ती पडल्यामुळें दोन्हीं सैन्यें शांत झालीं. सेनापतीची जागा मिळत नाहीं असें पाहून अदिलशहा विजापुरास गेला आणि इ. स. १४८९ मध्यें विजापूरची गादी स्थापन करून तो स्वतंत्र झाला.

बेदरचा ब्राह्मणी राजा दुसरा महंमदशहा लहान असल्यामुळें निजाम उलमुल्क सर्व कारभार पहात होता, परंतु राजा मोठा झाल्यावर तो सर्व कारभार पाहूं लागला, त्यामुळें निजाम उलमुल्काचें वजन कमी होऊं लागलें. तेव्हां तो अदिलशहा प्रमाणें स्वतंत्र होण्याचा प्रयत्न करूं लागला. राजाची स्वारी तेलंगणांत असतां तो बेदर येथें आला आणि आपला मुलगा मलिक अहंमद यांस बोलावून राजाची सर्व तिजोरी त्याच्या स्वाधीन करून त्यास जुन्नरास पाठविलें. राजास ही हकीकत कळतांच बेदरचा सुभेदार पसंदखान यांजकडून निजाम उलमुल्कास ठार मारविलें. बापाच्या मृत्यूची बातमी मलिक अहंमद यास कळतांच तो स्वतंत्र झाला आणि इ. स. १४८९ मध्यें त्यानें निजामशाहीची स्थापना केली.

मागील इतिहासावरून असें दिसून येतें कीं, निजाम उलमुल्क इतक्या योग्यतेस येण्यास व निजाम-

शाहींची स्थापना होण्यास हबशी लोक कारण झाले. दक्षिणी लोक जरी निजाम उलमुल्काच्या पक्षाचे होते, तरी धाडसाचीं व शौर्याचीं कृत्यें करणारे हबशी लोकांसारखे त्यावेळीं दुसरे लोक नव्हते. निजाम उलमुल्क अगदीं साधारण मनुष्य असता निजामशाहीची जी स्थापना झाली त्यास बहुतेक अंशीं हबशी लोक कारणीभूत होते; व त्याअर्थी निजाम-शाहींत हबशी लोक मोठमोठ्या अधिकारांवर असणें अगदीं साहजिक होतें. त्यांचा राज्यकारभारांत जस-जसा शिरकाव होऊं लागला, तसतसें त्यांचें शौर्य व शहापण हीं उघड दिसूं लागलीं. या पूर्वी राज्य-कारभारांत त्यांचा शिरकाव मुळींच झाला नव्हता, म्हणून त्यांचें चातुर्य दिसण्यास मार्ग नव्हता. इराण वगैरे परदेशीय पक्षांकडील लोकांशीं यांचें वैमनस्य असल्यामुळें, यांच्या मनांत महत्वाकांक्षा उत्पन्न होऊन राज्यसूत्रें आपल्या हातांत घेण्याचा हे प्रयत्न करूं लागले, व मोठमोठालीं कामें करून ते लवकरच प्रसिद्धीस आले.

विजापूरच्या राज्यांत यांचा शिरकाव झाला नव्हता, कारण तेथील राजे परदेशीय पक्षांचे होते. जे थोडे बहुत हबशी तेथें होते, त्यांस विजापूरच्या इस्माईल आदिलशहानें घालवून दिलें; परंतु पुढें

इ. स. १५३४ मध्यें इब्राइम आदिलशहा विजापुरच्या गादीवर बसल्यानंतर त्यानें शिया धर्म नाहींसा करून सुनी धर्माचें पुनरुज्जीवन करण्यास सुरवात केली. इराणी लोक शियाधर्माचे असल्यामुळें त्यांस लष्करांतून काढून त्यांच्या जागीं ३०,००० दक्षिणी व हबशी लोक ठेविले. याप्रमाणें दक्षिणेंतील मोठ्या दोन राज्यांत हबशी लोकांचा शिरकाव होऊन ते आपल्या पराक्रमानें व चातुर्यानें मोठ्या योग्यतेस पोंचले,

अल्ली आदिलशहा इ. स. १५७९ त मारला गेला. नंतर त्याचा पुतण्या इब्राहीम आदिलशहा हा विजापूरच्या गादीवर बसला. त्याचा सर्व संभाळ चांदबिबीकडे होता. दिवाणाचें व तिचें वांकडें आल्यामुळें तिनें धिटाई करून दिवाणास ठार मारविलें.

---

## चांदबिबीविषयीं दोन शब्द.

निजामशहाची मुलगी हुसेन विजापुरच्या राजास दिली होती, व निजामशहाकडून सोलापुरचा किल्ला तिला आंदण मिळाला होता. निजामशाही बुडण्याचा प्रसंग आला तेव्हां, त्या आणीबाणीच्या प्रसंगीं चांदबिबी नामक एका शूर स्त्रीनें अहमदनगरचें संरक्षण करून दक्षिणच्या इतिहासांत आपलें नांव अजरामर करून ठेविलें.

चांदबीबी ही राज्यकारभार पहात होती, परंतु तिचा वजीर फिष्वारखान यास स्वतंत्र राज्यस्थापन करण्याची इच्छा होऊन त्यानें तिला साताराच्या किल्ल्यांत कैद करून ठेविलें. तेव्हां एखलासखान व नेहंगखान आणि मि. आन अंजू हबशी सरदार यांनीं बंड करून राणीची सुटका केली. या कामगिरीबद्दल तिनें एखलासखानास आपला वजीर केला. विजापुरच्या दक्षिणी लोकांची आणि हबशी लोकांची नेहमी कलागत होत असे. त्यांच्यांतील वैमनस्य इतकें वाढलें होतें कीं, कित्येक प्रसंगीं भररस्त्यांत उभयतांच्या झटापटी होऊन रक्तस्रावही होत असे. त्याचाच परिणाम असा झाला कीं, अहमदनगर व गोवळकोंडा येथील राजांनीं विजापूरचे जे फार बळकट किल्ले नळदुर्ग व शहादुर्ग यांजवर हल्ला केला. परंतु तेथील रखवालदार शिपायांनीं फार शौर्यानें लढून त्यांचें संरक्षण केलें. नंतर हीं एकत्र झालेलीं सैन्यें विजापुरावर गेलीं, त्यावेळीं विजापुरास फक्त ३००० स्वार होते, परंतु इनउलमुख व अंकुसखान हे दोन सरदार, आपल्या बरोबर ८००० स्वार घेऊन आले, त्यामुळें शत्रूंस मागें राहावें लागलें. हे सरदार दक्षिणी असल्या कारणानें त्याच्या मध्यें आणि हबशी सरदारांमध्यें कांहीं कलागती होऊन

ते शत्रूकडे गेले आणि आतां विजापुरचें रक्षण होणें फार कठीण आहे, असें त्यांनीं त्यांस कळविलें. इतक्यांत जोराचा पाऊस पडून शहराच्या तटाच्या भिंतीस मोठी खिंड पडली, त्यामुळें विजापूर शत्रूच्या हस्तगत होईल असें वाटलें; परंतु राहिलेल्या सैन्यानें ती खिंड लवकर भरून काढल्यामुळें ती भीति दूर झाली. नंतर बेदरच्या सुभेदारानें मध्यस्ती करून त्या दोघां सरदारांची समजूत घातली, तेव्हां ते परत विजापुराकडे आले. हा वेढा विजापुरास एक वर्षपर्यंत पडला होता तरी विजापूर शत्रूच्या हस्तगत झालें नाहीं.

निजाम उल्मुल्कास मारल्याची खबर कळतांच त्याचा मुलगा मलिक अहंमद यानें स्वतंत्र होऊन इ. स. १४८९ सालीं निजामशाहीची स्थापना केली, हें पूर्वी कळविलेंच आहे. पुढें तो ब्राह्मणी राज्यांतून आपल्या बापास तनख्यादाखल जो मुलूख मिळाला होता तो हस्तगत करून तेथें आला, आणि तेथून उत्तर कोंकणांत चाल करून गेला. ह्या मोहिमेंत त्यास फार चांगलें यश आलें. ज्या किल्ल्याच्या योगानें विजयानगरच्या हिंदु राजांनीं मुसलमान राजांस तुच्छ मानिलें होतें, ते किल्ले त्यानें मोठ्या शौर्यानें लढून घेंतले आणि तेथें आपली सत्ता चालू केली. इ. स. १४९४ मध्यें त्यानें अहमदनगर ही आपली राज-

यांनी केली, आणि उत्तर कोंकणांत जितका मुलूख होता, त्या सर्व मुलुखाचें **दांडाराजपुरी** हें मुख्य ठाणें केलें.

**मलिक अहंमद** इ. स. १५०८ मध्यें मरण पावल्यानंतर त्याचा मुलगा **ब्रुहाण निजामशहा** अहमदनगरच्या गादीवर बसला. त्यावेळीं त्याचें वय सुमारें सात वर्षांचें होतें, त्यामुळें सर्व राज्यकारभार जुन्या अनुभविक अमलदारांच्या हातांत होता. याच्या कारकीर्दींत प्रथम पुरुष **मिरझाअल्ली** व **कलबअल्ली** हे दोन ठाणेदार अहमदनगराहून **दांडाराजपुरीस** आले. त्यांनीं राजपुरीच्या पश्चिमेस समुद्रांत एका खडकाळ टापूवर **पंचैतन** पीरांची स्थापना केली. मे. **लारकम** साहेब ह्मणतात कीं, हल्लीं जंजिऱ्यामध्यें **शीया पंथी** पंचैतन पिराची दरगा आहे.

ह्यावेळीं राजपुरीस कोळी लोक रहात असत. त्यांस तेथें चांचे व मलबारी लुटारू लोकांपासून फार त्रास होत असे, ह्मणून त्यांच्यापैकीं बरेच लोक, टापू निर्भय वाटल्यामुळें तेथें येऊन राहिले. (सदरहु टापू हाच जजिरा किल्ला होय.) तेथें आपल्या संरक्षणाकरितां त्यांनीं टापूच्या सभोंवर लाकडी मेढे कोट बांधिला होता आणि ठाणेदाराच्या मदतीनें ते चांचे व मलबारी लोकांपासून आपला बचाव करीत होते.

ह्या कोळी लोकांचा मुख्य, रामपाटील ह्मणून होता. तो राजपुरीच्या ठाणेदाराशीं विरुद्ध वागु लागला, व त्यास टापूवर येण्याची मनाई करू लागला; तेव्हां ठाणेदारानीं ही हकीकत निजामशहास कळविली. त्यानें पिरंमखान नांवाच्या सरदाराबरोबर लष्कर व आरमार देउन राजपुरीस पाठविलें. तो राजपुरीस आल्यावर ठाणेदारानीं तो टापू हस्तगत करून घेण्याचा आपला संकेत त्यास कळविला. पिरंमखानाचें सर्व लष्कर व आरमार दांडाराजपुरीच्या खाडींत होतें. तेथें रामपाटलाकडील कांहीं लोक चौकशी करण्याकरितां गेले, त्यांस पिरंमखानानें जाहजावर घेऊन दारू पाजिली आणि दारूच्या दोन बाटल्या रामपाटलास नजराणा पाठविल्या, त्यावरून रामपाटील खुष होऊन पिरंमखानास सामोरा गेला व त्यास तो आपल्या टापूवर घेऊन आला. पिरंमखानानें आपल्या बरोबर आणलेली दारू कोळी लोकांस यथेच्छ पाजली व ते अगदीं धुंद झाले आहेत, अशी संधी पाहून त्यांनीं त्यांच्यावर एकदम हल्ला केला, व रामपाटलास कैद करून ठाणेदाराबरोबर त्यास निजामशहाकडे पाठविलें, आणि आपण राजपुरीस राहिला. रामपाटील तिकडे गेल्यानंतर मुसलमान झाला ह्मणून बादशहानें

त्यास "यतीबारराय" हा किताब देऊन छत्री व निशाण दिलें. तीं अद्याप त्यांच्या वंशजाकडे चालत आहेत. या शिवाय त्यास ताडी पिण्याकरितां बारा राहाट्या व टापूच्या मेढे कोटाच्या आंतील जागा देऊन, तेथील दर्यांत मच्छी मारण्याकरितां खुटांस जागा दिली. आणि रामपाटलानें टापूवर गस्त घालावी, समुद्रांत छबिना फिरवीत जावा, व टापूवरील हरएक काम त्यानें करावें, अशा हुकमासह बादशहानें रामपाटलास इ. स. १५२२ मध्यें राजपुरीस पिरंमखानाकडे पाठविलें. तेथें आल्यानंतर कांहीं दिवस रामपाटील हा पिरंमखानाच्या अनुरोधानें वागत असे, परंतु पुढें तो त्याचा हुकूम मानीनासा झाला ह्मणून पिरंमखानानें त्याच्या विरुद्ध बादशहास कळवून बादशहाकडून त्याचें डोकें मारण्याविषयीं हुकूम मिळविला व त्याप्रमाणें पिरंमखानानें इ. स. १५२२ मध्यें रामपाटलाचें डोकें मारलें. रामपाटलास मारल्यानंतर टापूवरील सर्व सत्ता पिरंमखानाच्या स्वाधीन झाली. पिरंमखानानें सुमारें बारा वर्षें हा अधिकार चालवून तो इ. स. १५३८ मध्यें मरण पावला.

पुढें निजामशहाकडून बुहाण याची नेमणूक ठाणेदाराच्या जागीं झाली. त्यानें कांहीं वर्षें काम

केल्यानंतर इ. स. १५६७ साली हुशन निजाम-शहाचा हुकूम मागवून टापूस कोट बांधण्याचें काम सुरू केलें. त्या कामास राजपुरी तालुक्याच्या उत्पन्नाचा पैसा पुरत नव्हता ह्मणून, बादशहाच्या हुकूमानें चौलच्या सुभ्याकडून पैसा घेऊन इ. स. १५७१ साली कोटाचें काम त्यानें पुरें केलें, व त्यास "किल्ले-महरूब उर्फ जंजिरा" हें नांव दिलें. नंतर इ. स. १५८७ साली इस्मायल निजामशहाच्या हुकमानें अलगखान ठाणेदार झाला. हा आपल्या लष्करांतील शिपाई लोकांवर फार प्रीति करीत असे. तो आपला मुलगा इभ्राइमखान याच्याकडून सर्व काम चालवीत असे, इ. स. १६१२ मध्यें तो निवर्तला. यानें एकंदर २५ वर्षें अधिकार चालविला.

त्यानंतर इभ्राइमखान यास मुर्तुजा निजामशहानें इ. स. १६१२ मध्यें ठाणेदार नेमिलें. इ. स. १६१७ मध्यें बादशहाचा वजीर मलिकंबर यानें शिद्दी अंबर हबशी सानक यास जंजिऱ्याचे कारभारावर पाठविलें, त्यानें मुलखाचा चांगला बंदोबस्त करून कित्येक कसबे व गांव वसविले. इ स. १६१८ मध्यें इभ्राइमखान मरण पावला. यानें एकंदर ६ वर्षें ९ महिने १४ दिवस कारभार चालविला.

सिद्दी अंबर हबशी यानें मुलखाचा चांगला बंदोबस्त केला ह्मणून बादशहानें खुष होऊन, त्यास विजापुरचा व्यापार व मक्केस जाणारे हाज्जी नागोठण्याच्या खाडीपासून बाणकोटाच्या खाडीपर्यंतचा सर्व मुलूख नौकासेनापतीच्या अंमलाखालीं बक्षिस दिला होता. इतकेंच नाहीं, परंतु श्रेष्ठ जनसत्ता व राज्यपद्धतीप्रमाणें ठराव करण्यांत आला होता. हाच जंजिरा संस्थानचा मूळ पुरुष होय.



# भाग २ रा.

## जंजिरा संस्थानांतील नबाबांच्या कारकीर्दी.

| | |
|---|---|
| जंजिरा संस्थान ज्या पुरुषानें संपादन केलें त्या मुळ पुरुषापासून हल्लींच्या नबाबापर्यंतची कारकीर्द. | २ संस्थानांत फेरफार.<br>३ इंग्रज सरकारशीं करारनामे.<br>४ राज्यव्यवस्था व कायदेकानू.<br>५ राज्याचें उत्पन्न कमी व जास्ती. |

इ० स० १६१७ मध्यें मूर्तुजा निजामशहाच्या हुकुमानें शिद्दी अंबर हबशी यांस जो प्रगणा बक्षिस केला होता त्याची मूळपिठिका भाग २ मध्यें आली आहे. तोच या संस्थानाचा मूळ पुरुष होय

### शिद्दी सुरूलखान.

(इ. स. १६१८ पासून इ स. १६२० पर्यंत).

हा अमलदार रयतेच्या संरक्षणाकरिता फार मेहनतीनें झटत असे व शहाण्या लोकांशीं स्नेह ठेवित असे. यानें थोडक्याच काळांत आपलें नांव अमर ठेवून इ० स० १६२० मध्यें तो मरण पावला.

### शिद्दी याकुतखान.*

(इ. स. १६२० पासून १६२१ पर्यंत.)

हा अमलदार इ. स. १६२० मध्यें दांडा राजपुरी येथें आला. त्याचे बरोबर त्याचे धर्मगुरु सय्यद-

---

* यास याकुत शाहाजली असेंही म्हणत. हा गौंड्याच्या ब्राह्मणी सुभ्याच्या पुत्राचा नौकाधिपती होता. राज्याच्या पडते-

अह्मी साहेब वजीर हे आले. यावेळीं सर्व निजाम-शाहींतील जमिनीची पैहाणी करण्याचें काम शिद्दी मलिकंबरानें चालविलें होतें. त्याप्रमाणेंच त्यानें दांडा राजपुरी येथें पहाणी करण्याकरितां शिद्दी अंबर जो इकडील अधिकाऱ्याचें काम पाहत होता, त्याजकडे पहाणीचीं सर्व प्रमाणें पाठविलीं आणि सर-हद्द कायम करण्याकरितां नकाशे पाठवून असें कळविलें कीं, सरहद्दीवर खुणेच्या टाक्या ठेवाव्या, व त्या नदीचा किनारा अगर डोंगराची उतरण असेल अशा ठिकाणीं कायम कराव्या; आणि दर बिघ्यास जो गल्ला होईल त्याचा दशांश रयतेपासून घ्यावा. हीं सर्व कामें करून तुह्मी इकडे यावें. हीं कामें झा-ल्यांनंतर तो बादशहाकडे गेला आणि जंजिऱ्यास आ-ल्यापासून जीं कामें केलीं होतीं तीं सर्व त्यानें बादशहास कळविलीं. शिवाय असेंही कळविलें कीं,—जंजि-

काळांत यानें कोंकणांत राज्य स्थापण्याचा प्रयत्न केला. तें राज्य हपशान या नांवानें चालू आहे.

१. यापूर्वी लहरी पाहाणी जाहाली होती ती प्रत्येक बिघ्यास पाऊण लहरी घेत असत. प्रत्येक लहरीचे नाण्याची किंमत साहा आणे असे. त्या लहरीचे एके बाजूस सनाचा आंकडा असे. हें नाणें हल्लीं कोठेंही दिसण्यांत येत नाहीं. व त्याचा तपासही लागत नाहीं.

ऱ्याच्या अमलदारास चांचे वगैरे लुटारू लोकांपासून फार त्रास सोसावा लागतो व तेथील वसूल ऐन जिन्नस असून घेणारे लोक फार थोडे असल्याकारणानें तो फार स्वस्त दरानें विकला जातो, त्यामुळें तेथील उत्पन्न खर्चास पुरत नाहीं.

पुढें कांहीं दिवसांनीं जंजिऱ्याचा अमलदार निवर्तल्यानें बादशहास कळल्यावरून शिद्दी अंबर हा तिकडील कामाचा माहितगार असल्यामुळें त्यास तिकडे पाठवावें असा बादशहाचा हेतू होता; परंतु **मलिकंबरानें** असें सुचविलें कीं, तेथील उत्पन्न खर्चास पुरत नाहीं, सबब चौलच्या सुभ्याकडून पैसा पुरवावा लागतो. त्यापेक्षां तो मुलूख—कोणास तोडून दिला असता दुसरीकडून पैसा द्यावा लागणार नाहीं. हें बोलणें बादशहास मान्य होऊन त्यानें शिद्दी अंबर यास जंजिरा दांडा राजापुरीची सानक* (जाहा-

* **सानक** व **तोफा** असे जाहागिरीचे दोन प्रकार आहेत. **तोफा** जाहागिरी परत घेता येते, परंतु **सानक** जाहागिरी परत घेता येत नाहीं. **सानक** ही पद्वी आहे. त्याचप्रमाणें **सानक** या शब्दाच्या अर्थ मुसलमानीमध्यें एका भांड्याचें नांव आहे. ह्मणजे थाली, रकबी, परल, जोगली, वगैरे प्रमाणेंच **सानक**ही त्यास ह्मणतात. सबब खाण्याच्या खर्चाकरितां ही जाहागिरी वंशपरंपरा दिली आहे, ती अद्यापि चालू आहे.

गिरीची सनद ) व निशान देऊन कोल करारावर इ. स. १६२१ सालीं जंजिऱ्यास पाठविलें.

---

## शिद्दी अंबर सानक.

(इ. स. १६२१ पासून इ. स. १६४२ पर्यंत).

इ. स. १६२१ मध्यें **शिद्दी अंबर सानक** हे जंजिरा दांडा **राजपुरीची सानक** जाहागिरीची सनद घेऊन आले, हें मागील भागांत आलें आहे. तेव्हांपासून यांस **शिद्दी अंबर सानक** असें ह्मणत. या वेळेपासून निजामशाहीकडून अंमलदार येण्याचें बंद होऊन शिद्दी अंबर हे स्वतंत्रतेनें या मुलखाचा अंमल चालवूं लागले.

**मलिक अंबर** निजामशाहींतील वजीर इ. स. १६२५ सांत मरण पावला. नंतर अहंमदनगरच्या राज्यास उतरती कळा लागली. इ. स. १६३० मध्यें

---

सिंध देशांत सर्व लोक **सानक** हा शब्द वापरतात, व हे भांडें तेथें विकतात. आमच्या देशांत याला जोगली अथवा परल असें ह्मणण्याची चाल आहे. कुणबी लोकांमध्यें हें भांडें आहे. तें मातीचें व दगडाचेंही असतें. रत्नागिरी जिल्ह्यामध्यें सांवतवाडींत याची फारच चाल आहे; त्याचप्रमाणें इतर ठिकाणींही आहे. याबद्दल एक गोष्ट आहे, परंतु स्थलसंकोचास्तव ती येथें देतां येत नाहीं.

**शाहाजान** बादशाहानें दक्षिणेंत स्वारी केली त्या वेळीं त्यानें अहंमदनगरचा तिसरा **मुर्तुजा** याचा पराभव केला. नंतर त्याच्या वजिरानें त्यास ठार मारिलें. पुढें **मलिक अंबर**चा मुलगा **फत्तेखान** यानें एका लहान मुलास राज्यावर बसवून त्याच्या नांवानें राज्य चालविलें. परंतु **शाहाजाना**चा सुभेदार **मोहबतखान** दक्षिणेंत होता त्यानें **फत्तेखाना**चा पराभव करून ज्या मुलास त्यानें राजा केला होता, त्यास इ. स. १६३३ च्या फेब्रुआरी महिन्यांत ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत नेऊन ठेविलें. याप्रमाणें निजामशाहीचा शेवट झाला. नंतर शाहाजी भोंसले यानें दुसऱ्या एका मुलास गादीवर बसवून त्याच्या नांवानें राज्य चालविलें, परंतु **शाहाजान** इ. स. १६३५ सांत आपलें सैन्य घेऊन दक्षिणेंत आला, आणि सैन्याचे दोन भाग केले. एक भाग शाहाजीस पाठविला आणि दुसरा विजापुरावर पाठविला. त्यावेळीं विजापुरकरांनीं **शाहाजानाशीं** तह केला, त्यांत अहंमदनगरचा जो भाग कोंकणांत होता तो विजापुरकरास मिळाला. मोंगलाबरोबर सामना करण्याचें शाहाजीचें सामर्थ्य नव्हतें, त्यामुळें तो बादशहास शरण गेला. बादशाहानें त्यास क्षमा करून आपल्या नोकरींत ठेविलें.

शिद्दी अंबर सानक यानें २५ वर्षें ६ महिने १७ दिवस जाहागिरीचा उपभोग घेतला आणि इ. स. १६४२ मध्यें तो मरण पावला. यास शिद्दी युसूफखान नांवाचा एक मुलगा होता तो गादीवर बसला.

---

## युसूफखान.

(इ. स. १६४६ पासून इ. स. १६४९ पर्यंत).

शिद्दी युसूफखान गादीवर बसल्यानंतर कित्येक दिवस हबशी लोकांच्या सल्यानें तो जाहागिरीचा कारभार चालवीत होता. पुढें आपणास 'राजा' असा किताब मिळविण्याकरितां तो मोंगलबादशाहाकडे इ. स. १६४८ सांत गेला, आणि इकडे आपला मुलगा फत्तेखान यास हबशी लोकांच्या इतल्यानें कारभार चालविण्याचें सांगून त्यास आपले जागीं ठेविलें. फत्तेखानानें थोडे दिवसपर्यंत हबशी लोकांच्या संमतीनें काम चालविलें, परंतु यास हलकट व व्यसनी लोकांची संगत लागल्यामुळें त्यांच्या नादानें तो वागूं लागला. या लोकांनीं फत्तेखानास असें सांगितलें कीं,—आपले बाप

---

१ या विषयीं मि. ग्रॅन्ट डफ हे मराठ्यांच्या बखरीमध्यें असें लिहितात कीं, हा ऍबीसीनियन होता, परंतु खाफीखानच्या मताप्रमाणें तो अफगानी होता.

**युसूफखान** हा, बादशहाकडे जाऊन परत येईल त्या-वेळीं त्यांस किल्ल्यांत घेऊं नये.–ही मसलत शिद्दी **युसूफखानाच्या** भरंवशाचे लोकांस समजली, तेंव्हां त्यांनीं **युसूफखानास** पत्र पाठविलें. त्यावेळीं **युसू-फखान** सुरतेस होता, तें पत्र त्यास पोहचतांच फार दिलगीर होऊन तो सुरतेहून चौलास मागें आला आणि चौलच्या सुभेदाराची भेट घेऊन त्यास सांगितलें कीं, मुलावर स्वारी करण्याकरितां सैन्य व खर्च आपल्या कडून मिळावा, माझ्या ताब्यांत मुलूख आल्यानंतर झालेला सर्व खर्च तुह्मांस मी परत देईन. हें ऐकून सुभेदारानें सांगितलें कीं, मुलावर स्वारी करून जय-मिळविला तरी त्यांत तुमचा लौकिक नसून कदाचित अपजय झाल्यास मात्र हांसें होईल. या प्रमाणें **युसू-फखानाची** समजूत करून त्याचे खर्चाकरितां रो-ह्याच्या खाडीकिनाऱ्यावरील बारा गांव (हल्लीं मांडल टप्यांत **बाहेरपट्टी** या नांवानें मोडतात ते) खर्चास देऊन त्यास आपल्या जवळ ठेऊन घेतलें, पुढें **युसूफखान** यानें आपल्या हयातीचे दिवस तेथेंच घाल-वून इ.स. १६९१ सालीं तो **चौल** येथें मरण पावला.

## फत्तेखान.

(इ. स. १६४८ पासून इ. स. १६६७ पर्यंत.)

इ. स. १६४८ मध्यें याचा बाप सुरतेकडे गेल्यापासून हा गादीवर होता; याला हलकट व व्यसनी लोकांची संगत होती हें प्रथमच सांगितलें आहे. त्यामुळें जे लोक शिद्दी अंबर खानकच्या कारकिर्दी पासून राज्यकारभारांत पुढारी होते, त्यांचे कांहीं चालेनासें झालें. ही संधी श्रीछत्रपती महाराजानें पाहून इ. स. १६४८ सांत हबशांचे तळें, घोसाळें, बिरवाडी, रायगड, वगैरे किल्ले घेतले.

फत्तेखान गादीवर बसल्यापासून हबशी लोकांचीं मनें आपल्याविषयीं शुद्ध नाहींत असें त्यास वाटत होतें; आणि त्यांत वाईट चालीच्या लोकांनीं भर घातल्यामुळें प्रत्येक दिवशीं तो दोन दोन, चार चार, हबशांच्या माना उडवूं लागला. या प्रमाणें ५०–७५ हबशी मारले गेले, त्यावेळीं शिद्दी खैर्यत व शिद्दी काशीम हे दोन हबशी जंजिऱ्यांत होते त्यांस असें वाटलें कीं, फत्तेखान हलके लोकांच्या नादीं लागून आह्मा हबशी लोकांस विनाकारण मारीत आहे. आतां येथें राहून आपला मान राहाणार नाहीं, आणि कोणत्या वेळीं कोणता भयंकर प्रसंग

येईल त्याचा नेम नाहीं, असा विचार करून ते विजा-पुराकडे जावयास निघाले. जंजिरा किल्ला घेण्याचा शिवाजीचा पूर्वीपासून प्रयत्न होताच; त्यानें ही संधी पाहून इ. स. १६५९ सालीं शामराजपंत पेशवे व बाजीघोलप यांच्या बरोबर सैन्य देऊन त्यास जंजि-ऱ्यावर पाठविलें.

शिद्दी खैर्यत व शिद्दी काशीम असे उभयतां बंधु विजापुरास जात असतां वाटेंत, त्यांस कोणी सिद्ध पुरुष भेटला. त्यानें त्यांस विचारलें कीं, तुह्मी आपलें ठिकाण सोडून कां निघाला? तुमच्या कि-ल्ल्यावर येण्याकरिता एक बलाढ्य शत्रू निघाला आहे, त्याचा पराभव तुमच्या शिवाय होणार नाहीं, या करितां तुह्मी मागें जाऊन शत्रूंस हांकून द्यावें. हें ऐकून ते दोघे मागें फिरून तळया पावेतों आले, तों शामराजपंताचें सैन्य आपल्या मागोमाग आल्याची खबर त्यांस लागली. हे दोन शूर हबशी बच्चे त-ळयास आल्याचें शामराजपंतास समजताच त्यानें तत्काळ तळयास वेढा घातला. हें पाहून दोघेही त-ळयाच्या काजीकडे गेले. त्यानें त्यांस आश्रय देऊन आपल्या घरीं जनानखान्यांत ठेविलें. हे दोघे शिद्दी काजीच्या घरीं असल्याचें शामराजपंतास कळतांच त्यांनीं काजीच्या घराचा झाडा घेतला, परंतु हे ज-

मानखान्यांत असल्याकारणानें सांपडले नाहींत. नंतर काजीनें त्या हबशींस मोठ्या सावधपणानें व युक्तीनें रातोरात राहाटाडास आणून मच्छीमारू होड्यांतून जंजिऱ्यास रवाना केलें. शिद्दी खैर्यत व शिद्दी काशीम जंजिऱ्यांत येतांच फत्तेखान मोठ्या आनंदानें त्यांस भेटण्यास गेला. त्यावेळीं त्यांनीं शिवाजीकडील सैन्य घेऊन शामराजपंत जंजिऱ्यावर येत आहे असें सांगितलें. तेव्हां खैर्यतखानास सुभेदार करून फत्तेखानानें त्याच्या ताब्यांत सर्व लष्कर दिलें. शामराजपंत सैन्यासह राजपुरीस आला तेव्हां शिद्दी खैर्यत यानें त्यास सांगून पाठविलें कीं, किल्ला घेण्याची तुमची इच्छा असल्यास तुह्मी स्वतः येऊन आह्मांस भेटावें, तुमच्या व आमच्या विचारानें जें कांहीं करणें असेल तें करू. या बोलण्यावर विश्वास ठेऊन शामराजपंत किल्ल्यात गेला, आणि शिद्दी खैर्यतखान यास त्यानें सांगितलें कीं, आह्मी तुह्मांस पुष्कळ द्रव्य व सरंजाम देतों, तुह्मी जंजिरा किल्ला आह्मांस द्यावा. हें त्याचें ह्मणणें कबूल न करितां शिद्दी खैर्यतखान यानें त्यास कैद करून जंजिऱ्यांत ठेविलें. शामराजपंताचें लष्कर राजपुरीस असल्या कारणानें त्याचा कांहीं उपाय चालेना. शेवटीं शामराजपंतानें—जंजिऱ्यावर पुन्हां

कधीं येणार नाहीं असें वचन दिलें तेव्हां खैर्यतखा- नानें त्यास सोडून दिलें. तो राजपुरीस आला आणि आपलें सैन्य घेऊन सातार्‍यास माघारा निघुन गेला. ही हकिकत शिवाजीस कळली तेव्हां शिवाजीनें त्यास पुन्हां जंजिर्‍यावर जाण्यास सांगितलें; परंतु शामराजपंतानें, वचन दिलें असल्या कारणानें, जंजिर्‍यावर जाण्याचें नाकबूल केलें. त्यामुळें शाम- राजपंतावर महाराजांची इतराजी झाली. आणि महाराजांची आज्ञा घेऊन शामराज घरीं बसला.

शिवाजीनें याच वर्षीं ह्मणजे इ. स. १६५९ सालीं निळोपंत रघुनाथपंत मुजुमदार यांजबरोबर दर्यासारंग, दौलतखान व मायाजी भाटकर यांस आरमार व मावळे लोकांचें सैन्य देऊन जंजि- र्‍यावर पाठविलें. ह्या आरमारानें जंजिर्‍यास वेढा घातला व रहदारी बंद केली. दुसर्‍या दिवशीं शिद्दी खैर्यतखान यानें आपले शिबंदीचे लोक एकत्र- मिळवून तोफांचा भडिमार चालविला. मराठ्यांच्या सैन्यांतूनही तोफा सूटत होत्या. परस्परांचे युद्ध चाललें असतां फत्तेखान फार भ्याला आणि खैर्य- तखानास ह्मणाला, शत्रूंचा जोर फार आहे तेव्हां विनाकारण श्रम न घेतां शत्रूंस किल्ला देऊन जीवाचें रक्षण करावें हें बरें. तेव्हां शिद्दी खैर्यतखान व

शिद्दी काशीम यांनीं त्यास सांगितलें कीं,--आह्मी हबशी लोकांनीं मोठी मेहनत घेऊन ही जागा संपादन केली आहे, तेव्हां ही जागा शत्रूंस आपण होऊन देण्यापेक्षां मृत्यु बरा. जर तुझा जीव तुला आवडता होता, तर मग तूं असला मोठा अधिकार स्वीकारावयाचा नव्हता. राज्य ह्मटलें कीं प्रथम जिवित्वाची आशा सोडावी लागते.--अशा रीतीनें मार्मिक भाषण करून त्याच्या आंगीं त्यांनीं स्फुरण चढविलें तेव्हां दुसरें दिवशीं सकाळीं किल्ल्यातील लोक मोठ्या निकरानें लढले. त्यामुळें मराठ्यांचा मोड झाला आणि त्याच रात्रीं निळोपंत राहिलेल्या सैन्यासह सातार्‍यास परत निघून गेला.

पुढें इ. स. १६२१ च्या पावसाळ्यांत शिवाजीनें व्यंकोजीपंताबरोबर ५००० स्वार व २००० मावळे देऊन त्यास जंजिर्‍यावर पाठविलें. त्यानें येऊन शिघ्र व आंबोली, या गांवांच्या मैदानांत तळ दिला. ही बातमी खैर्यतखानास कळतांच त्यानें शिद्दी अबदुल्लाखान व शेखपठाण यांजबरोबर हबशी व मोकाशी लोकांचें लष्कर देऊन त्याच्यावर पाठविलें. उभयपक्षांची कित्येक दिवस लढाई झाली. तींत व्यंकोजीपंतास १२ जखमा झाल्या, व त्याचे बरेच स्वार मारले गेले. मराठे सैन्याचा अगदीं मोड

होणार इतक्यांत शिवाजीकडून निघालेले मोरोपंत पिंगळे सैन्यासह व्यंकोजीपंतास येऊन मिळाले. तेव्हां मराठ्यांच्या सैन्यास जोर चढून त्यांनीं हबशी सैन्यास मागें हटविलें. मराठी सैन्यांतील लोक पाठलाग करीत राजपुरीपर्यंत आले. त्यामुळें हबशांच्या सर्व सैन्यास त्वरा करून किल्ल्यांत यावें लागलें. मराठी सैन्यानें राजपुरीस येऊन हबशांचें आरमार हस्तगत केलें, आणि सर्व सैन्य राजपुरीस तळ देऊन राहिलें. तेव्हां मराठी आरमारावरील दौलतखान नांवाच्या सरदारानें समुद्रांतील खडकावर किल्ला बांधून त्याचें नांव पद्मदुर्ग ठेविलें. त्यास हल्लीं पद्मदुर्ग किंवा कासा किल्ला असें ह्मणतात. राजपुरीस गडकोट बांधिला आणि जागोजाग चौक्या पहारा ठेविला. यावेळीं किल्ल्यांतील अन्नसामुग्री संपल्यामुळें जहाजांतून अन्नसामुग्री नेत असत, ह्मणून शिवाजीनें संभुगुराव नांवाचें मोठें तारूं व दुसरी कित्येक तरांडी तयार करून ती दर्यासागर नांवाच्या आरमाराकडील सरदाराबरोबर देऊन त्यास जंजिऱ्याचा सभोंवतीं वेढा घालण्यास सांगितलें.

इ. स. १६६५ सांत औरंगजेबानें दिल्लीहून मिरझा जयशिंग व दिलेलखान पठाण यांस शिवाजीवर स्वारी करण्याकरितां पाठविलें. शिवाजीनें

मिरझा जयशिगाशीं तह करून असें सांगितलें कीं, निजामशहा किल्लेदार जंजिरा बळकावून बसला आहे त्यांस बोलावून आणून किल्ला आह्मांस द्यावा. त्याप्रमाणें मिरझा जयशिंग यानें त्यास बोलावणें पाठविलें. तेव्हां शिद्दी खैर्यत यानें शिद्दी संबूल यास त्यांजकडे पाठविलें. तो तिकडे गेल्यानंतर मिरझा जयशिंग यानें किल्ला शिवाजीस देण्याबद्दल त्यास सांगितलें; परंतु शिद्दी संबूल यानें सांगितलें कीं, बादशहाच्या हुकमाशिवाय आह्मी किल्ला देणार नाहीं. तेव्हां शिवाजीनें बादशाकडे पाठविण्याकरितां एक तहनामा तयार केला. त्यांतील पहिलें कलम जंजिरा किल्ला शिद्दीकडून आह्मांस द्यावा; असें होतें. तो तहनामा मिरझा जयशिंगानें बादशहाकडे मंजूर होण्याकरितां पाठविला; परंतु बादशहानें तें कलम मंजूर केलें नाहीं.

शिवाजीनें जीं आरमारें जंजिऱ्याच्या किल्ल्या समोंवतीं वेढा घालण्याकरितां पाठविलीं होतीं, त्यांनीं येऊन किल्ल्यास वेढा दिला तेव्हां फत्तेखान भीतीनें गांगरून गेला व किल्ल्यासह सर्व मुलुख मराठ्यांच्या स्वाधीन करून पळून जाण्यास तयार झाला. ही गोष्ट शिद्दी खैर्यतखान व शिद्दी कासीमखान यांस

कळतांच त्याने फत्तेखानास कैद केलें. तो कैदेंत असतां इ. स. १६६७ सालीं मरण पावला.

---

## शिद्दी खैर्यतखान.

( इ. स. १६६७ पासून इ. स. १६९६ पर्यंत )

फत्तेखानास कैद केल्यानंतर शिद्दी खैर्यतखान गादीवर बसला. त्यानें सर्व सरदारांस सांगितलें कीं, व्यंकोजीपंत राजपुरीस आज सुमारें ६ वर्षें तळ देऊन बसला आहे; परंतु तुह्मी जोर धरून लढाई चालवित असल्याकारणानें किल्ला हस्तगत करून घेण्याची त्यास संधी मिळाली नाहीं. यावेळपर्यंत तुह्मीं किल्ल्याचें जसें संरक्षण केलें, तसें आतां करून हबशांचें नांव राखावें व शत्रूंस हाकून लावावें. याप्रमाणें हबशीलोकांस उत्तेजन देऊन आपण स्वतः आपला भाऊ काशीमखान यास बरोबर घेऊन तोफखाना सोडण्यास आरंभ केला. तथापि पुढें तीन वर्षेंपर्यंत शत्रूंचा तळ राजपुरीस होताच. मराठे लोकांचा ९ वर्षेंपर्यंत राजपुरीस तळ असून त्यांस घालवून देतां येत नाहीं, असें पाहून शिद्दी खैर्यतखान यानें औरंगजेब बादशहाकडे मदत मागितली. त्यानें इ. स. १६७० सालीं शिद्दी संबूळ यांस आरमारासह सुरतेहून कुमकेस पाठविलें.

हबशांच्या मुलखावर इ.स. ११४८ पासून स्वाऱ्या करून मराठे हबशांस फार त्रास देत असत. अहमदनगरचें राज्य नष्ट झाल्यामुळें व विजापूरच्या राज्याचें सामर्थ्य त्यावेळीं दुसऱ्यास मदत करण्यासारखें नसल्याकारणानें हबशांस दक्षिणेंत मदत करणारें मुसलमानी राज्य कोणतेंहि नव्हतें. ह्मणून शिद्दी संबूळखान, शिद्दी खैर्यतखान व शिद्दी काशीमखान या तीन हबशांनीं सुरतच्या मोंगल सुभेदारांस विनंती केली कीं,—बादशहानें आह्मांस आरमारावर मुख्य नेमून वेळोवेळीं मदत केल्यास आह्मी आपल्या मुलखाचे बादशहाच्या अमलाखालीं संरक्षण करूं—ही गोष्ट सुभेदारानें बादशहास कळविली, त्यानें ती मान्य करून शिद्दी संबूळखान यास आपल्या आरमारावर मुख्य नेमिलें, आणि त्यास सुरत येथील तीन लक्ष रुपायांचा वसूल तोडून दिला. इ. स. १६७० मध्यें सुरतेहून शिद्दी संबूळखानाच्या बरोबर पाठविलेलें आरमार जंजीऱ्यास येतांच हबशी लोकांनीं मोठ्या निकरानें लढाई करून शत्रूच्या सैन्याचा पराभव केला, आणि त्यांतील १०० लोकांस धरून त्यांच्या पायांस दगड बांधिले व त्यांस समुद्रांत बुडविलें. हें दुष्ट कृत्य पाहून व्यंकोजीपंत राहिलेल्या सैन्या-

सह सातान्यास पकून गेला. नंतर शिद्दी संबूळहि आपलें आरमार घेऊन सुरतेस निघून गेला.

शिद्दी संबूळ यानें सुरतेच्या सुभेदाराशीं कलह केल्यामुळें त्याजकडे असलेल्या आरमाराचा अधिकार इ. स. १६७७ चा पावसाळा संपतांच शिद्दी काशीमखान याच्याकडे देण्याविषयीं बादशहानें हुकूम केला. त्याप्रमाणें करण्याचें शिद्दी संबूळखान यानें कबूल केलें, व मोंगलाचे आरमार घेऊन तो मुंबईस आला. त्यावेळीं हबशी आरमाराचा मुख्याधिकारी शिद्दी काशीमखान हाही आरमारासह तेथें गेला. उभयतांनीं आपआपलें आरमार मुंबई बंदरांत ठेविलें, तेथें असतां शिद्दी संबूळानें मुंबई बंदराच्या दक्षिण किनाऱ्यावर जाऊन तेथील चार सभ्य ब्राह्मणास धरून जाहाजांवर कैदेंत ठेविलें. हें चौलच्या मराठा सुभेदारास कळतांच त्यानें इंग्लिशांस अशी दहशत घातली कीं, ह्या चार ब्राह्मणांची सुटका झाली नाहीं तर परिणाम फार वाईट होईल. तेव्हां इंग्लिशांनीं शिद्दी काशीमखान यांस सांगून, त्या ब्राह्मणास सोडून दिवविलें व ब्राह्मणास धरण्याच्या कामीं शिद्दी संबूळास ज्यांनीं मदत केली होती त्यांस शासन केलें.

शिद्दी संबूळ व शिद्दी काशीम हे दोन हबशी आपल्या आरमारांसह मुंबईत असतांना त्यांचा आप-

सांत कलह होऊन लढाई झाली. तींत दोन्ही पक्षाक- डील कित्येक लोक मारले गेले. त्यावेळीं इंग्लिश मध्यस्ती पडून त्यांनीं असें ठरविलें कीं, शिद्दी का- शीम यानें शिद्दी संबूळ याचीं बायकामुलें जंजि- ऱ्यांत ठेविलीं होतीं, तीं त्यास परत द्यावीं, आणि मोंगलाच्या जाहाजांपैकीं एक जाहाज शि- द्दी संबूळ याच्या हुकमांत ठेवावें. परंतु शिद्दी सं- बूळ यास हें करणें पसंत पडलें नाहीं. तो शिवाजी राजाकडे निघून गेला! शिद्दी संबूळ निघून गेल्यामुळें मोंगलांचे सर्व आरमार शिद्दी काशीम याच्या स्वा- धीन झालें.

शिवाजीस जंजिरा किल्ला घेण्याचा इतका ध्यास लागला होता कीं, कोणी सिद्ध बावा भेटल्यास त्यास किल्ला केव्हां हातीं येईल असें तो विचारीत असे. एके दिवशीं केळशीस याकुत नांवाचा कोणी सिद्ध पुरुष त्यांस भेटला. त्यास जंजिरा किल्ला केव्हां हस्तगत होईल असें शिवाजीनें विचारलें, तेव्हां तो सिद्ध पुरुष कांहीं न बोलतां मुकाट्यानें जाऊं लाग- ला; परंतु शिवाजीनें त्याच्या मागोमाग जाऊन त्याचे पाय धरले. तेव्हां त्यानें कांहीं न बोलतां आपल्या दाढी व मिशीचे दोन पिकलेले केंस काढून त्याच्या हातांत दिले. ते शिवाजीनें गोविंद विश्वनाथ प्रभु

याच्या जवळ ताईत करण्याकरितां दिले असतां त्या-जवळून ते हरवले ह्मणून शिवाजीची त्याजवर इतराजी होऊन त्यांनीं त्यास पोतनिशीच्या जागेवरून दूर केलें. नंतर श्री सद्गुरू रामदास स्वामींस शिवाजीनें विचारलें, परंतु त्यांनींही उत्तर दिलें नाहीं. शेवटीं शिवाजीचा फार आग्रह पाहून स्वामी ह्मणाले, फार दिवस प्रयत्न केल्यास कदाचित किल्ला हातीं लागेल. इ. स. १६७८ सालीं शिद्दी काशीम हा मोंगल व शिद्दी आरमारांचा मुख्य झाला; व मुंबईहून कोंकण किनाऱ्यानें मराठ्यांच्या मुलखावर स्वाऱ्या करून धरलेल्या ब्राह्मणलोकांस त्यानें हलकीं कामें करण्यास लाविलें. आणि पुन्हा मुंबईच्या बंदरात जाहाजांसह तो आला. पुढें थोड्याच दिवसांनीं अलीबाग किनारा लुटला ह्मणून शिवाजीच्या सेनापतीनें शिद्दी काशीमचीं जाहाजें लुटण्याचा प्रयत्न केला, परंतु त्यास यश आलें नाहीं. पुढें शिद्दी काशीम आपलें आरमार घेऊन सुरतेस परत गेला.

इ. स. १६७८ मध्यें शिवाजीनें आपलें आरमार वाढविलें, आणि शिद्दी व मोंगल यांच्या आरमारावर आपणास हल्ला करतां यावा ह्मणून खांदेरीवर आपले आरमार उतरून तेथें किल्ला बांधण्याचें काम सुरू केलें. त्यावेळीं जंजिरा व मुंबई यांच्या दरम्यान

शिवाजीच्या आरमारावर दौलतखान, दर्यासारंग व मायनाईक भाटकर हे सरदार होते शिवाजीनें खांदेरीवर किल्ला बांधण्याचें काम सुरू केलें असें शिद्दी काशीम यास कळतांच तो सुरतेहून आपला सरदार शिद्दी बिल्लाल यास बरोबर घेऊन आरमारासह खांदेरीवर आला, आणि राजपुरी येथील पोलादखान नांवाच्या सरदारास बोलावलें. शिवाय त्यानें इंग्लिशांस मदतीस घेऊन शिवाजीचा सरदार दौलतखान यास ठार मारिलें. परंतु दर्यासारंग, व मायनाईक भाटकर या सरदारांनीं मोठ्या शूरत्वानें लढून खांदेरी किल्ला शिद्दी काशीमच्या हातीं लागूं दिला नाहीं. नंतर शिद्दी काशीम आपलीं सर्व जहाजें घेऊन मुंबईस गेला; व तेथून कांहीं जहाजें पेण खाडींत पाठवून, मराठ्यांचीं पुष्कळ खेडींपाडीं व गांवगन्ने त्यानें जाळलीं, व बरेच लोकांस कैद केलें. त्यावरून शिवाजीनें इंग्लिशांशीं तह करून असें ठरविलें कीं, मराठ्यांचा किनारा लुटणार नाहीं असें जर शिद्दीनें वचन दिलें नाहीं, तर शिद्दीचीं जहाजें इंग्लिशांनीं पावसाळ्यांत मुंबई बंदरांत राहूं देऊं नयेत. तेव्हां शिद्दी याकूतखान यानें इ. स. १६७९ मध्यें खांदेरीच्या समोर खडपावर किल्ला बांधून त्यास नांव

उंदेरी ठेविलें, आणि तेथें आपलें कांहीं आरमार नेवून ठेविलें.

इ. स. १६८० मध्यें शिवाजी मरण पावल्यानंतर शिद्दी काशीम आपलीं जाहजें घेऊन दांडाराजपुरी येथें यावयास निघाला. त्यावेळीं इंग्लिशाचे मालावर जास्त कर वाढल्यामुळें, शिद्दी काशीम यास असें वाटलें कीं, मोंगल बादशहा इंग्लिशांच्या विरुद्ध आहे. व या समजुतीनें त्यानें मुंबई बंदराचा दक्षिण किनारा लुटला, कित्येकांस कैद केलें, आणि धरलेल्या लोकांस मुंबई शहरांत विकण्यास नेलें. ह्या प्रसंगामुळें इंग्लिशांचे हबशांशीं वैमनस्य वाढून तारीख ४ मे स १६८० सालीं मुंबई नजीक माजगांव येथें इंग्लिश व शिद्दी काशीम यांची लढाई झाली. तींत दोन्हीकडील बरेच लोक मारले गेले व जखमी झाले. दुसऱ्या दिवशीं हबशांचें सैन्य इंग्लिशांच्या इतक्या जवळ आलें कीं, त्यांनीं त्यावर तोफा सोडल्या आणि किनाऱ्यावर हल्ला करणार नाहीं व कैद केलेले लोक सोडून देईन असें शिद्दीचें वचन घेतलें व त्यास मुंबई बंदरांत जहाजें नांगरण्याची परवानगी दिली.

संभाजी गादीवर बसल्यानंतर त्यानें शिद्दी काशीम यांचीं गलबतें जाळण्याचा प्रयत्न चालविला. उंदेरी किल्ल्यावर मराठ्यांचे ३०० लष्करी लोक

उतरले व तेथें हबशी व मराठे यांच्यामध्यें लढाई होऊन मराठ्यांचा पराजय झाला; व त्यांच्या कडील मायनाईकांचा मुलगा व दुसरे कित्येक लोक मारले गेले. त्यापैकीं ८० लोकांचीं शिरें गलबतांत घालून शिद्दी काशीम यानें मुंबई माजगांव येथें आणिलीं आणि तीं भाल्यावर एका रांगेमें लावून ठेविलीं, परंतु इंग्लिशांनीं दोस्तीच्या नात्यानें असें न करण्यास त्यास सांगितलें.

इ. स. १६८० च्या अखेर वेंगुर्ल्यावर हल्ला करण्याकरितां शिद्दी काशीम याचें सैन्य दक्षिण किनाऱ्याकडे गेलें. तिकडे बरीच लुटफाटकरून त्यांनीं कांहीं खेडींपाडींही जाळलीं. पुढें शिद्दी काशीम यानें आपल्या आरमारापैकीं कांहीं भाग उंदेरीस पाठविला व बाकीचें सर्व आरमार घेऊन, तो कुलाब्यावरून मुंबईस जाणाऱ्या येणाऱ्या गलबतांवर हल्ले करूं लागला. इ. स. १६८१ मध्यें उंदेरी किल्ल्यावर (ह्यावेळीं शिद्दीकडील किल्लेदार शेकमहंमद होता). संभाजीकडील दर्यासारंग व मायनाईक या दोन आरमारावरील सरदारांनीं हल्ला केला. त्यांत मराठ्यांचा पराभव झाला, परंतु या कारणावरून शिद्दी काशीम यानें कुलाब्याचा किनारा लुटला व तेथील संभावीत लोकांस धरिलें. त्यांत कांहीं मुसल-

मानही होते, तरी पण त्यांस इंदेरीस आणून १८००० रुपये सुटकेकरितां देईपर्यंत त्यांचा निर्दयतेनें छळ केला.

इ. स. १६८० मध्यें केलेल्या कराराप्रमाणें शिद्दीचें वर्तन बरोबर न होऊं लागल्यामुळें इंग्लिशांनीं शिद्दीचीं जहाजें मुंबई बंदरांत ठेवण्यास हरकत घेतली. तेव्हां शिद्दी काशीम यानें त्याचवर्षी इंग्लिशांच्या सांगण्यावरून सोडून दिलेल्या कैद्यांच्या सुटकेबद्दल त्यांच्याकडे पैशांचें मागणें केलें. त्याचवेळीं सुरतेच्या मोंगल सुभेदारानेंही इंग्लिशांच्या वखारीस वेढा घालण्याचें शिद्दी काशीम यास उत्तेजन दिल्यामुळें त्यानें दोन दिवसपर्यंत चार तोफा वखारीच्या दरवाजावर ठेविल्या त्यामुळें वखार दोन दिवस बंद होती.

इ. स. १६८१ च्या आक्टोम्बर महिन्याच्या शेवटीं शिद्दी काशीम यानें, मुंबई बंदरांतून निघून, इंग्लिशांचें न ऐकतां मराठ्यांच्या मुलखाशीं जीं गलबतें व्यापार करीत होतीं त्यांच्यावर हल्ला केला. त्यांत त्यानें इंग्लिशांचें एक गलबत धरिलें व कुलाब्याच्या किनाऱ्यावरील कांहीं खेडींपाडीं जाळून तो चौलास आला, परंतु तेथें त्यास यश मिळालें नाहीं.

इ. स. १६८२मध्यें संभाजीनें दादाजी देशपांडे यांस, जंजिरा किल्ला हस्तगत करून घेण्याकरितां मायनाईक व गोविंदराव काथे ह्या दोन सरदारांस बरोबर देऊन आरमारासह पाठविलें, आणि किल्ला हस्तगत केल्यावर अष्ट प्रधानांपैकीं प्रधानकी देण्याचें त्यास वचन दिलें. त्यानें येऊन एकदऱ्या जवळील टेंकडीवर तळ दिला. पुढें संभाजी आपल्याबरोबर सुलतान अकबर व २०,००० सैन्य घेऊन एकदऱ्यावर येऊन दादाजीस मिळाला. ही कुमक आल्यानंतर मराठ्यांनीं मोठा जोर धरून किल्ल्यावर तीस दिवसपर्यंत तोफांच्या गोळ्यांचा वर्षाव केला. त्यामुळें समोरील बाजूचा किल्ल्याचा तट पडला आणि किल्ल्यांतील लोक टेंकडीच्या आश्रयास राहिले. हबशांकडून तोफा सुटत होत्याच. लढाईकरून किल्ला हस्तगत होत नाहीं असें पाहून संभाजीनें खंडोजी व फर्जंद यांस दारूखान्यास बत्ती लावण्याकरितां किल्ल्यांत पाठविलें, परंतु हें त्याचें कपट शिद्दी खैर्यतखानास कळतांच त्यानें त्यास धरून हाल हाल करून जिवें मारिलें. शिद्दी खैर्यत किल्ल्यांतून लढत असतां शिद्दी काशीम यानें संभाजीचे आरमार जंजिऱ्याच्या खाडींतून हांकून लाविलें,

तेव्हां **संभाजीनें** जंजिऱ्याची खाडी आठशें चौरस वार रुंद आणि तीस वार उंच दगडांनीं भरून काढण्याचा प्रयत्न चालविला. परंतु हें काम पुरें होण्यापूर्वींच **दादाजी रघुनाथ** व कांहीं लष्कर **संभाजीनें** एक दऱ्यावर ठेऊन आपण मोंगलाशीं सामना करण्याकरितां निघून गेला. त्यामुळें **दादाजीनें** खाडी भरण्याचें काम सोडून दिलें.

**संभाजी** गेल्यानंतर कांहीं दिवस शिद्दी **काशीम** आपलें आरमार घेऊन जंजिऱ्याचें संरक्षण करीत होता, पण पुढें तो आरमारासह मुंबईस गेला. त्यावेळीं इंग्लिशांनीं प्रथम त्यास मुंबई बंदरांत राहण्यास हरकत घेतली, परंतु **औरंगजेब** बादशहाची इतराजी होईल या भितीनें शेवटीं त्यास मुंबई बंदरांत गलबतें नांगरण्याची परवानगी दिली. शिद्दी **काशीमचें** आरमार मुंबईस गेल्याची संधी पाहून **दादाजीच्या** सैन्यानें एके दिवशीं मध्य रात्रीच्या वेळीं जंजीऱ्याच्या कोटास शिड्या लावून आंत शिरण्याचा यत्न चालविला; परंतु किल्ल्यांतील लोकांनीं दगडांचा वर्षाव करून त्यांचे दोनशें लोक मारल्यामुळें **दादाजी रघुनाथ** निराश होऊन राहिलेल्या सैन्यासह निघून गेला.

दादाजीनें किल्यावर हल्ला केल्याची खबर शिद्दी काशीम यास मुंबईस कळतांच त्यानें कुलाब्याचा किनारा लुटला; कित्येक ठिकाणीं गोवध केला; कित्येक खेडींपाडीं आणि गांवगन्ने जाळलीं, आणि माहाडापर्यंत जाऊन दादाजीच्या बायकोस धरून आणलें. याप्रमाणें मराठ्यांस अत्यंत त्रास देण्याचा त्यानें क्रम चालविला. तेव्हां हा सूड उगविण्याकरितां इ. स. १६८२ च्या आक्टोबर महिन्यांत संभाजीनें आपलें आरमार त्याजवर पाठविलें. या वेळीं शिद्दीचें आरमार मुंबई नजीक माजगांव येथें होतें. शिद्दी मुंबूलचा मुलगा शिद्दी मिश्री हा मराठी आरमाराचा मुख्य होता. शिद्दी काशीम यांचीं जरी या वेळीं फक्त १५ जाहाजेंच होतीं व मराठ्यांचीं ३० होतीं तरी या लढाईत हबशांसच जय मिळाला. शिद्दी मिश्री गोळी लागून मरण पावला.—मुंबई बंदरांत शिद्दीचें आरमार राहूं दिलें असतां घारापुरीवर "ऐलीफन्टा" तोफा सोडूं—असें मराठ्यांच्या चार जाहजांनीं इंग्लिशांस भय घातलें, त्या प्रमाणें त्यांच्याकडून घडून आलें नाहीं. पुढें त्यांनीं, मोंगल व हबशी यांच्या विरुद्ध आपल्याशीं तह करावा असें इंग्लिशांस कळविलें. हें वर्तमान

शिद्दी **काशीम** यास कळतांच त्यानें नवंबर महि-न्यांत आपलें आरमार पेण खाडींत नेऊन मराठ्यांचे दोनशें लोक कैद केले व आपलें कांहीं आरमार मुंबई माजगांव येथें ठेऊन बाकीच्या आरमारासह आपण सुरतेस गेला. जें आरमार मुंबई येथें होतें, त्यांच्यांत व इंग्लिशांत वारंवार झटापटी होऊं लागल्या. एके वेळीं तर इंग्लिशांचे दोन शिपाई कापले गेले व हब-शांचे तीन जखमी झाले. (सन १६८३).

इ. स. १६८४ मध्यें मुंबई शहर इंग्लिशांनीं आपलें मुख्य ठाणें केलें, व सुरतेच्या वखारींतील गुमास्ते आणि मालमत्ता त्यांनीं मुंबईस आणण्याचा विचार केला, पण मोंगलानें त्यास अटकाव केल्यामुळें इ. स. १६८९ च्या आरंभीं **सर जान चाईल्ड** यानें मोंगलाचीं कांहीं जाहजें धरिलीं. त्यापैकीं एकांत मक्केस जाणारे यात्रेकरू होते. ते धरल्यामुळें बादशहास फार राग आला व त्यानें इंग्लिशास हिंदुस्थानच्या बाहेर घालवून देण्याचा आपल्या सर्व अमलदारास हुकूम केला. त्यांनीं इंग्शिांच्या वखारीवर हल्ले करून त्यास अगदीं जेरीस आणिलें. सुरत येथील इंग्लिशां-ची वखार तेथील मोंगल सुभेदारानें ताब्यांत घेऊन तिच्यांतील सर्व माल विकून टाकिला. पुढें सिद्दी

काशीम यानें बादशहाच्या हुकुमावरून तारीख १४ फेब्रुआरी रोजीं रात्रीं मुंबईच्या पूर्वेकडील किनाऱ्यावर, शिवरी येथें २०,००० सैन्यासह उतरून दुसरे दिवशीं माजगांवच्या किल्ल्यावर चाल केली. तेव्हां किल्ल्यांतील रखवालदार लोक खजिन्याच्या आठ नऊ पेट्या व हत्यारांच्या चार पेट्या, चौदा तोफा आणि दोन गनीला, इतकें टाकून पळून गेले. सिद्दीनें आपलें निशाण किल्यावर चढविलें व कांहीं सैन्य तेथें ठेऊन कांहीं मुंबई लुटण्याकरितां पाठविलें. माजगांवाहून सिद्दीस घालविण्याकरितां, इंग्लिशांनीं सत्तर सत्तर शिपायांच्या दोन पार्ट्या व आपण होऊन निघालेले कांहीं लोक, असें लष्कर पाठविलें, परंतु त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. पुढें शिवरी, माहीम, वगैरे इंग्लिशांचीं ठिकाणें सिद्दी काशीम यानें एकामागून एक घेतलीं व तीन महिनेपर्यंत मुंबईस तो तळ देऊन राहिला.

या प्रमाणें हिंदुस्थानांत सर्व ठिकाणीं इंग्लिशांचा अगदीं मोड झाल्यामुळें त्यांनीं लढाई करण्याचा नाद सोडून दिला, व शिद्दी काशीमच्या मध्यस्तीनें बादशाहाशीं तहाचें बोलणें करण्याकरितां (विजापुरास औरंगजेब बादशहाची छावणी असतां)

आपले दोन वकील त्यांजकडे पाठविले. बादशाहानें असें ठरविलें कीं,–इंग्लिशांनीं दीड लक्ष रुपये द्यावे व पुढें आपली वर्तणूक चांगली ठेवण्याचें कबूल करावें, व त्यांनीं ह्या दोन अटी कबूल केल्या तर त्यांचीं ठिकाणें त्यांस परत द्यावीं. या ठरावाप्रमाणें शिद्दी **काशीम** यानें इंग्लिशांपासून दोन्ही अटी पुऱ्या करून घेऊन त्यांचीं सर्व ठिकाणें त्यांस परत दिलीं. या तहाच्या कामीं शिद्दी **काशीम**खान यानें चांगलें साहाय्य दिलें ह्मणून इंग्रज त्याच्याशीं दोस्तीच्या नात्यानें वागूं लागले. नंतर इ. स. १६९० मध्यें शिद्दी **काशीम** जंजिऱ्यास आला.

मराठ्यांनीं हबशांचा जो मलूख बळकाविला होता, तो परत घेण्याकरितां **खैर्यत**खानानें आपला भाऊ शिद्दी **काशीम** यास जंजीऱ्यांत बंदोबस्ताकरितां ठेवून आपल्याबरोबर ६०० हबशी लोकांचे व ६००० मोकाशीचें लष्कर घेऊन मराठ्यांबरोबर लढाई सुरू केली. मोकाशांच्या लष्करांत **दामाजी-सबनीस** या नांवाचा एक शूर सरदार होता, तो या लढाईत जखम लागून मरण पावला. आणि हबशांस जय मिळून त्यांनीं तळें, घोसाळें, रायगड, वगैरे मराठ्यांकडे असलेले आपले किल्ले हस्तगत करून

तेथें आपलीं ठाणीं ठेविलीं. या लढाईत हबशांनीं लुटालूट करून द्रव्याचा बराच संचय केला. याचवेळीं सिंहगडावर मोंगलांची आणि मराठ्यांची लढाई चालली होती, त्यांत मदत करण्याकरितां बादशाहानें खैर्यतखानास बोलाविलें. तेव्हां तो, आपलें लष्कर व सय्यदअल्ली वजीर यांस बरोबर घेऊन सिंहगडावर गेला, आणि शत्रूवर हल्ला करून त्यानें त्यांचा पराभव केला. या विजयामुळें बादशाहास फार आनंद होऊन त्यानें खैर्यतखानास "खानअल्लीशान"

---

१ दुसऱ्या माहिती वरून असें कळतें कीं, औरंगजेबानें खैर्यतखानास बोलाविलें असतां तो गेला नाहीं, त्यामुळें बादशहाचा त्यावर राग झाला. हें खैर्यत खानास कळतांच तो आपल्याबरोबर सय्यद अल्ली साहेब वजीर त्यांचे धर्म गुरू यांस घेऊन बादशाकडे गेला, तेव्हां वजीराच्या सांगण्यावरून खैर्यतखान आपल्या डोकीवर तबकांत कुराणाची पोथी घेऊन भेटीस गेला. बादशहास आपल्या धर्माचा फार अभिमान असल्या कारणानें त्यानें खडी ताजीम देऊन खैर्यत खानाचा चांगला मान ठेविला, व बादशाहाचे सांगण्यावरून सैय्यदअल्ली वजीर यास १२ गांव खैर्यत खानानें इनाम दिले ते पुढें कोणत्या कारणानें सरकारांत आले त्याची योग्य माहिती मिळत नाहीं, परंतु त्यापैकीं मेंदडी गांव त्याजकडे आद्याप इनाम चालत आहेत.

हा किताब देऊन आंबे पातुरची जाहागिरी दिली. नंतर खैर्यतखानानें तें नांव बदलून "पंचतन पातूर" असें नांव ठेविलें. खैर्यतखान जंजीऱ्यास आल्यानंतर सिद्दी काशीमखान सुरतेस गेला.

इ. स. १६९६ मध्यें खैर्यतखान रायगड किल्ल्यांत असतां मरण पावला. त्याचें शव पेटींत घालून खोकरीस आणिलें, आणि तेथें त्यानें आपल्या हयातींत आपणाकरितां जो गुमज बांधून ठेविला होता त्यांत त्या प्रेतास दफनाविलें. हा राजा मोठा शूर, धूर्त आणि हूशार होता. त्यानें मोठमोठ्या लढाया करून आपलें राज्य वृद्धिंगत केलें होतें.

---

## शिद्दी काशीम ऊर्फ याकुतखान.

(इ. स. १६९६ पासून इ. स. १७०७ पर्यंत).

खैर्यतखान निवर्तल्यानंतर सिद्दी काशीम जंजिऱ्याच्या गादीवर बसला. या वेळीं अंजनवेल किल्ल्यांतील लोकांत आपसांत तंटा चालला होता. ही संधी पाहून खैर्यतखानानें आपल्याबरोबर हबशी व कोकाशी लोकांचे लष्कर घेऊन किल्ल्यावर हल्ला केला, आणि किल्ला सर केला, व खैरतखानानें

मिळविलेल्या प्रत्येक किल्ल्यावर त्यानें किल्लेदार सुभेदार, पांच पांच हबशी व कांहीं लष्कर ठेविलें.

याकुतखानास कोणीं असें सांगितलें कीं, बाळाजी विश्वनाथ तुमचा ताबेदार असून तो गुप्त रीतीनें आंग्र्याशीं मसलत करीत असतो. बाळाजी विश्वनाथ हा देशमूख असून श्रीवर्धन, गोवेलें, बोरलई, मांडले, आणि म्हसळें या चार टप्प्यांचा कुळकर्णी होता, त्याच्या सल्ल्यानें आंग्रे तुमच्यावर स्वारी करण्याच्या तयारींत आहे. हें वर्तमान ऐकून याकुतखानास फार राग आला; व त्यानें बाळाजी विश्वनाथ यास पकडण्याकरितां स्वार शिपाई पाठविले; परंतु बाळाजी विश्वनाथ पूर्वींच पळून गेल्यामुळें त्यांच्या हातीं लागला नाहीं. तेव्हां त्याचा भाऊ जानोजी विश्वनाथ यास पकडून जंजिऱ्यास आणलें आणि गोणत्यांत घालून समुद्रांत बुडविलें.

शिद्दी याकुतखान यानें पुढें कांहीं दिवसांनीं गोवळकोंडचा किल्ला सर केल्यानंतर घोसाळें व कोंडाणें किल्ल्यावरून शीराजुल्मुल्क, मलीकमैदान आणि कलालबागडी, या तीन तोफा आणण्याकरितां शेख सुलेमान नाईक यास पाठविलें. त्यानें राह्याटाडाहून त्या तोफा तकत्याच्या तराफ्यावरून जं-

जीऱ्यांत आणल्या ह्मणून सुलेमान नाईक यास राहाटाड गांव इनाम दिला.

इ. स. १७०१ मध्यें याकुतखानानें जंजीरा किल्ल्यास दुसरा तट बांधण्याचें काम सुरू केलें. त्यावेळीं हबशी सरकाराकडे २२ किल्ले होते तेः—

| | |
|---|---|
| १ अवचितगड. | १२ विक्टोरियागड.बा- |
| २ गोंवळकोंड. | १३ विजयदुर्ग. [नकोट. |
| ३ मदनगड. | १४ मंदगड. |
| ४ प्रतापगड. | १५ कोंडाणें. |
| ५ फत्तेदुर्ग. | १६ रायगड. |
| ६ यशवंतगड. | १७ उंदेरी. |
| ७ घोसाळें. | १८ कतूरगड. |
| ८ तळेगड. | १९ मुक्तारगड. |
| ९ सूरगड. | २० खूपगड |
| १० अंजनवेळ. | २१ बीरवाडी. |
| ११ पद्मदुर्ग (कासाकिल्ला.) | २२ जंजिरा (संस्थान). |

या किल्ल्यावरील सुभेदारांस याकुतखानानें असा हुकूम पाठविला कीं, प्रत्येक सुभेदारानें किल्ल्याचा एक एक बुरूज व एक फांज पुरी होईपर्यंत खर्च पुरवावा. या प्रमाणें आलेला सर्व पैसा कि-

ल्याच्या कामाकडे खर्च होत असल्यामुळें, मराठ्यां-
वर स्वारी करून लूट फाट व खंडणी मिळविण्या-
च्या उद्देशानें शिद्दी सुरूल व शिद्दी फरंजद या
दोन हबशांबरोबर लष्कर देऊन त्यांस मराठ्यां-
च्या मुलखावर पाठविलें. हे लोक लुटालूट करीत
मुढखोऱ्यापर्यंत गेले. तेथें खंडणी व लूट मिळाली
नाहीं, ह्मणून त्यांनीं तेथील देशमुख बाळाजी रख-
माजी व त्याचा मुलगा तुकाजी यांस पकडून जं-
जिऱ्यास रवाना केलें, आणि तेथें चौथाई खंडणी
बसविली. येथें आल्यानंतर बाळाजीस किल्ल्याच्या
खर्चाचा हिशेब ठेवण्याकडे याकुतखानानें नेमिलें.

शिद्दी सुरूलखान यानें मुढखोऱ्यावर खंडणी
बसविल्यानंतर तो मराठ्यांच्या मुलखांत लुटफाट
करूं लागला. जे खंडणी देत नसत व लुटींत हरकत
करीत त्यांचे हालहाल करी व कित्येकांस बाटवी. ही
हकिकत मराठ्यांनीं औरंगजेब बादशाहास कळ-
विली. तेव्हां बादशहानें याकुतखानास बोलविलें.
बाटविलेले लोक बरोबर घेऊन तो बादशहास भेट-
ण्यास गेला. बादशहानें त्यास, या लोकांस जुलमानें
बाटविण्याचें व लुट करण्याचें कारण विचारिलें; तेव्हां
याकुतखानानें सांगितलें कीं, किल्ल्याचें काम सुरूं

केलें आहे, त्याचे खर्चास उत्पन्नाचा सर्व पैसा लागत असल्याकारणानें इतर खर्चाची फार अडचण पडली. त्यामुळें मराठ्यांशीं लढाई करून खंडणी घ्यावी लागली, व खंडणी न देणारांस बाटवावें लागलें. बाटविलेल्या सर्व लोकांस महमदी धर्मात प्रवीण केलें असून त्यांस **नौमुसलीमनहफीज** असें नांव दिलें आहे. या लोकांकडून बादशहानें कुराण वाचून घेतलें, तेव्हां त्यास फार आनंद झाला आणि त्यास '**इमारत निशाण**' हा किताब दिला व बाटविलेल्या लोकांस **छोरवाद**[१] हें नांव दिलें. **याकुतखान औरंगजेबाचा** निरोप घेऊन परत आला.

याकुतखान राजपुरीस आपल्या हवेलींत अजारी पडला असतां, आपला मृत्यु समीप आला असें जाणून त्यानें सर्व शिद्दी सरदारांस जवळ बोलावून असें सांगितलें कीं, माझा अंतकाल समीप आला आहे. हें राज्य मोठ्या मेहनतीनें जीवाची अशा न धरितां मिळविलें आहें. या गोष्टीचें चांगलें स्मरण ठेऊन तुह्मी हुशारीनें त्याचें संरक्षण करा आणि रयतेचें पालन करण्याविषयीं तत्पर असा. कोणी चां-

---

१ छोरवाद नांवाचा मोहला जंजिऱ्याच्या किल्ल्यांत आहे. त्यास छोरवाद लोक असें ह्मणण्याची चाल आहे.

गला माणूस पाहून त्यास गादीवर बसवा आणि राज्याची व्यवस्था सर्वानुमतें चालवा असें सांगून शिक्का, मोहर, दुराई, खजीना वगैरे हीं सर्व आमच्या नांवानें जशीं चालत आहेत त्या प्रमाणेंच पुढें चालवावीं असें सांगितलें. नंतर शिद्दी सुरूलखान कांसे किल्ल्यावरील किल्लेदार हा राज्य चालविण्यास योग्य वाटल्यावरून त्यांस सर्वानुमतें गादीवर बसविण्याचा निश्चय झाला.

इ. स. १७०६ तारीख १० जमादिलावल रोजीं याकुतखान मरण पावला. यानें आपणाकरितां खोकरीमध्यें गुमज बांधिला होता, त्यांत त्यास दफन देण्यांत आलें. यानें १० वर्षे २ महिने व २१ दिवस राज्य चालविलें. यांस दोन मुलगे झाले होते; पण ते लहानपणींच मरण पावले. शिवाजी राजाच्या कारकीर्दीस आरंभ झाल्यापासून जंजिऱ्यावर मराठ्यांच्या स्वाऱ्या होत होत्या; परंतु शिद्दी काशीम याचे हातांत मोंगलांचे आरमार असल्याकारणानें समुद्रांत हबशास वेळोवेळीं मदत मिळत असे. मुंबई, माजगांव, उंदेरी, शिवरी, माहीम, वगैरे ठिकाणीं इंग्लिशांचा व मराठ्यांचा अपजय करून शिद्दी काशीम यानें मोंगलाच्या आरमारावर असतां मोंग-

लाच्या व हबशांच्या कोणत्याही शत्रूंस पुढें सरसाऊं दिलें नाहीं. याच्या क्रूर कृत्यांची मराठ्यांच्या मुलखांत फार भीति वाटत असे. आपल्या शत्रूंचा नाश होण्यासारखें कोणतेंहि कृत्य करण्यास तो भीत नसे. मग तें कृत्य कितीही भयंकर किंवा अमानुष असो. यानें बरेच किल्ले घेऊन हबशांचें राज्य वृद्धिंगत केलें.

---

## शिद्दी सुरूलखान.

(इ. स. १७०६ पासून इ. स. १७३२ पर्यंत).

**याकुतखानाचा** चेला शिद्दी **सुरूलखान** हा गादीवर बसला आणि याकुतखानानें सांगितल्या प्रमाणें राज्याची व्यवस्था चालविली. राज्यकारभार शिद्दी सरदारांच्या मतानें शेख **सुलेमान** नाईक चालवीत होता. त्यानें तीन वर्षेपर्यंत किल्ल्याचें काम व राज्याचा कारभार चांगल्या रीतीनें चालविला. परंतु पुढें **सुरूलखानास** लबाड व लुच्चे लोक मिळाले त्यामुळें राज्य कारभारांत शिद्दी सरदारांचा सल्ला घेण्याचें **सुरूलखानानें** सोडून दिलें. शिलेमान नाईक यांस कारभारावरून दूर केलें. किल्ल्याच्या कामाकरितां सुभ्याकडून जो पैसा येत असे, तो त्या

कामाकडे खर्च न करितां दुसऱ्या इमारती बांधण्याकडे लाविला. या खर्चानें त्यानें आपल्याकरितां एक व आपल्या मुलीकरितां एक, अशा दोन मोठमोठ्या हवेल्या बांधल्या. शिवाय आपणा स्वतःकरितां एक गुमज व राजपुरी येथें जुमा मशीद बांधिली. आणि किल्ल्याचें काम बंद ठेविलें. राज्यकारभारांत अगदीं अव्यवस्था झाली त्यामुळें ठिकठिकाणाहून खंडणी येण्याची बंद झाली. हें पाहून सर्व शिद्दी सरदारांनीं **सुरूलखानास** दहशत घातली कीं, तुह्मी लबाड लोकांची संगती धरून कारभारांत आमच्या मत्ताची कांहीं जरूर ठेवीत नाहीं, किल्ल्याचें काम फार महत्वाचे असता ते बंद ठेऊन इतर कामाकडे सुभ्यांचा पैसा खर्च करितां हें योग्य नाहीं. या वाईट गोष्टी टाकून चांगल्या मार्गावर न याल तर दौलतीचा बंदोबस्त आह्मांस करणें भाग पडेल. नंतर सर्व शिद्दी सरदारांनीं असें ठरविलें कीं, मुलीकरितां बांधलेल्या हवेलींत **तोशीखाना** ठेवावा व जुमा मशीदीचें काम धर्मकृत्याचें आहे, सबब तीस लागलेला खर्च कमी करून **सुरूलखानानें** आपल्याकारितां बांधिलेल्या हेवेलीचा व गुमजाचा खर्च भरून द्यावा. हें ह्मणणें

मुरूलखानानें कबूल केलें व पूर्वीप्रमाणें राज्यकारभाराची सर्व व्यवस्था सुरळीतपणें चालू झाली.

किल्ल्याचें काम चालत असतां एके दिवशीं अफूरचा राहणार बाळसांवत मोकाशी यानें एकट्यानें १२ मनुष्यांच्या ओझ्याचा चिरा उचलून किल्ल्याच्या थरावर ठेविला. त्याची ती अचाट शक्ति पाहून सरकार खुष झाले आणि त्यास बक्षिस मागण्यास सांगितलें. त्यानें असें बक्षिस मागितलें कीं, गौळीलोक शिवाय करून सर्व लोकांस म्हैस टक्का व तुपावरील जकात माफ करावी. सरकारनें त्याचें मागणें कबूल करून दोन्ही करांपासून रयतेस मुक्त केलें. पूर्वी शिद्दी अंबरखानक यानें पहाणी केल्यापासून जमिनीच्या उत्पन्नाचा दहावा हिस्सा सरकारांत घेत असत, परंतु यावेळीं किल्ल्याचें काम चालत होतें, त्यामुळें खर्च वाढला ह्मणून शेखसुलेमान नाईक यानें रयतेकडून जमिनीच्या उत्पन्नापैकीं येणाऱ्या $\frac{1}{10}$ साऱ्याचें दर एक खंडीस निशानी तीन रुपये, व गायकास आठ आणें, हक्कदेशक आठ आणें, घोड्यांस उडीद एक पायली, गुरांस पेंढें ८०, वगैरे नवे कर रयतेवर बसविले.

इ. स. १७१३ मध्यें बाळाजी विश्वनाथ यानें शाहू राज्याच्या तर्फेनें कानोजी आंग्र्याशीं तह केला. या तहानें पोर्तुगीज व हबशी यांची सत्ता कमी करण्याची होती, ह्मणून कानोजी आंग्रे व बाळाजी विश्वनाथ यांनीं इ. स. १७१४ मध्यें जंजिऱ्यावर स्वारी केली. मराठे व हबशी यांची लढाई होऊन हबशांचा पराभव होण्याचा वेळ आल्यामुळें त्यानें बाळाजी विश्वनाथ याजपाशीं तह केला. त्यांत असें ठरलें कीं, मराठ्यांचा जो मुलूख हबशांनीं बळकाविला होता, तो त्यास परत द्यावा. या तहामुळें मराठ्यांचे हबशांकडे असलेले ११ किल्ले गेले. तेः—

| | |
|---|---|
| १ सुरगड. | ७ फत्तेदुर्ग. |
| २ प्रताबगड. | ८ कुतुरगड. |
| ३ यशवंतगड. | ९ विजयदुर्ग. |
| ४ बाणकोट. | १० मुक्तरगड. |
| ५ कोंडाणें. | ११ मदनगड. |
| ६ खुपगड. | |

याप्रमाणें शिवाजी राजाच्या कारकीर्दीपासून मराठ्यांशीं हबशांचें जें वैमनस्य होतें, तें सर्व या तहामुळें गेलें.

इ. स. १७२४ मध्यें शंकरखेड येथें मोंगलाशीं लढाई झाल्यानंतर निजामउलमुलुखानें हैद्राबाद

येथें आपल्या राज्याची गादी स्थापन केली. या लढाईमुळें दक्षिणेंत मोंगलांचें अधिपत्य होतें तें त्यांच्याकडून निघून **निजामउल्मुलुखास** मिळालें. तेव्हां त्यानें पूर्वी मोंगल बादशहा **औरंगजेब** याजकडून शिद्दी **खैर्यतखानास** मिळालेली, **आंबेपातुरची** जाहागिरी आपणाकडे घेतली. हें वर्तमान तेथील ठाणेदारानें **सुरूलखानास** कळविलें, तेव्हां त्यानें हैदराबादेवर स्वारी करण्याचा निश्चय केला. परंत, तिकडे सैन्य घेऊन गेलों तर मराठे जंजिऱ्यावर स्वारी करतील या भीतीनें या विचारांत **सुरूलखानानें** आपला तो बेत रहित केला.

इ. स. १७२८ मध्यें किल्ल्याचा बाहेरील कोट बांधण्याचें काम पुरें झालें. हें काम २८ वर्षेंपर्यंत चाललें होतें. या किल्ल्यांत २२ बुरूज आहेत त्यांचीं नांवें:-

| | |
|---|---|
| १ हुलमुख. | ८ सरदारी. |
| २ अरबा. | ९ किंदरी. |
| ३ बहादुर्शा. | १० पागार. |
| ४ याकुतखानी. | ११ पिंपळ. |
| ५ सुरूळी. | १२ कापुर कस्तुरी. |
| ६ अलवी. | १३ हैदरी. |
| ७ मर्जा. | १४ धमाम व तालिमखाना. |

| | |
|---|---|
| १५ नगीना. | १९ अदमणी. |
| १६ मूर्तुजा. | २० मोदीखान्याचा. |
| १७ खासगतचा. | २१ भुंडा. |
| १८ अल्ली. | २२ हुलमुख. |

येणेंप्रमाणें बुरूज असून आणखी शिवाय किल्ल्याच्या आंत दोन बुरूज आहेत. ज्यावर शेपटीची तोफ आहे त्यास गगन बुरूज असें ह्मणतात, व जो किल्ल्याच्या मध्यभागीं आहे त्यास खुनी बुरूज असें ह्मणतात.

सुरूलखानानें आपल्याकरितां जो गुमज बांधिला आहे; त्याची आपल्या मरणानंतर नीट व्यवस्था चालावी ह्मणून त्यानें सावली व मिठागर या दोन गांवांचें उत्पन्न आणि फैमखारीचें व दांडा येथील कांहीं वाड्यांचें उत्पन्न त्या गुमजाच्या खर्चाकरितां तोडून अशी सनद करून दिली कीं, गुमजाच्या व्यवस्थेकरितां ठेविलेल्या मनुष्याच्या नेमणुका जाऊन जो पैसा शिल्लक राहील, तो गुमजाच्या फैमखारीच्या दुरूस्तीकडे लावण्याकरितां अनामत ठेवावा व या उत्पन्नावर आमच्या वारसांचा हक्क नाहीं. ही सनद त्यानें फैम नांवाचा कारभारी होता त्याच्या स्वाधीन केली. नंतर त्यानें आपल्या बायकोचे सर्व डागडागिने

आपल्या मुलांस वाटून देऊन उसरोली गांव त्यांस इनाम दिला. याप्रमाणें व्यवस्था लावून **सुरूलखान** इ. स. १७३४ सालीं मरण पावला. त्यानें खोकरींत जो अपणाकरितां गुमज बांधिला होता, त्यांत त्यास दफन देण्यांत आलें. यानें २६ वर्षें १४ दिवस राज्य चालविलें, यास आठ ८ मुलगे होते. त्यांचीं नांवें —

| | | | |
|---|---|---|---|
| १ | शिद्दी अबदुल्ला. | ५ | शिद्दी जाफर. |
| २ | ,, अबदुल रहिमान. | ६ | ,, महमद. |
| ३ | ,, इब्राम. | ७ | ,, अबदुल रहीम. |
| ४ | ,, अबदुल कादिर. | ८ | ,, हसन. |

शिद्दी **सुरूलखान** मरण पावल्यानंतर गादीविषयीं तंटा उत्पन्न झाला. कांहीं शिद्दी सरदारांचा कट शिद्दी **सुंबुल** नांवाच्या सरदारास गादीवर बसविण्याचा होता, ही गोष्ट **सुरूलखाना**चा पहिला मुलगा शिद्दी **अबदुल्ला** यांस समजली. ह्मणून तो आपल्या बापाचे मयत खोकरीस पोहोंचविण्याकरितां न जातां किल्ल्यांतच राहिला. यामुळें शिद्दी **सुंबुल** याचे मनांतहि कपट येऊन तो जंजिरे बंदरापर्यंत मयत पोहोंचवून परत आला. संध्याकाळचे सात वाजल्यानंतर ह्मणजे मयतास दफनाऊन आल्यानंतर,

शिद्दी सरदार व हबशी भायबंद शिद्दी याकुत, शिद्दी रिझान व शिद्दी अंबर अफवाजी वगैरे परत सुरूलखानाच्या हवेलींत जमले. त्यांचे जवळ शिद्दी अबदल्लानें किल्लयाच्या व खजिन्याच्या किल्ल्यांचें मागणें केलें, तेव्हां शिद्दी सुंबुल यानें सांगितलें कीं, ज्यावेळीं कोणा एकास गादीवर बसविण्याचें कायम करूं, तेव्हां त्याच्या स्वाधीन चाव्या करण्यांत येतील, हल्लीं ही चौघांची अनामत असून चौघांच्या स्वाधीन आहे. ज्यास आह्मीं पसंत करूं त्यास गादीवर बसवूं, तुह्मीं तकरार करूं नये. ह्या बोलण्यानें शिद्दी अबदल्लास फार राग येऊन त्यानें आपली तरवार म्यानांतून काढली, व वार करण्याकरितां तो शिद्दी सुंबुलवर धांवून गेला. परंतु शिद्दी सुंबुलनें त्याचा वार चुकवून आपल्या तरवारीनें त्याच्यावर वार केला व त्यास ठार मारिलें. शिद्दी अबदल्लाच्या जवळच त्याचा धाकटा भाऊ शिद्दी हसन खेळत होता, त्यास हबीब सय्यदहुसेन साहेब ऐद्रुस यांनीं उचलून आपल्या आ-

---

१ हा शेख याकुत या नांवानें प्रसिद्ध होता. जंजीऱ्यांतील कोळ्यांचा हा वंशज होता. गुहागड येथील परंपरेनें पाटील होता. लहान असतां त्यास कैद करून मुसलमान केलें व पुढें तो लवकरच प्रसिद्धीस आला. तो शूर असल्यामुळें त्यास लष्करावर सुभेदार केलें होतें.

गरल्यांत लपविला. नंतर **सुरूलखानाचा** दुसरा मुलगा शिद्दी **अब्दुल रहिमान** यानें गादीवर बसण्याचा प्रयत्न केला, परंतु तो दुर्गुणी असल्या कारणानें शिद्दी सरदारांनीं त्यास गादीवर बसूं दिलें नाहीं. नंतर तो खोकरीस **शेखजी** सुभेदार होता, त्याचे जवळ जाऊन राहिला. या सुभेदाराचें व **अबदुल रहिमान** याचें पूर्वीपासून सख्य होतें. शिद्दी सरदारांनीं सर्वानुमतें **सुरूलखानाचा** धाकटा मुलगा शिद्दी **हसन** यास गादीवर बसविलें.

---

## शिद्दी हसनखान.

(इ. स. १७३२ पासून इ. स. १७३४ पर्यंत.)

शिद्दी **हसनखान** गादीवर बसला तो लहान असल्याकारणानें शिद्दी **संबुल** सर्व राज्यकारभार चालवीत होता. परंतु ही व्यवस्था **शेख याकुब** उर्फ **शेखजी** सुभेदार यास न आवडून त्यानें शिद्दी **अबदुल रहीम** यास गादीवर बसविण्याचा प्रयत्न चालविला; आणि आपल्या ताब्यांतील जें लष्कर खोकरी येथें किल्ल्याच्या दरवाज्यावर तोफा ठेवून होतें, त्यास त्यानें मागें फिरविलें.

याप्रमाणें एक वेळ किल्ल्याच्या दरवाजापासून मागें फिरविल्यानंतर **शेखजी सुभेदार** व शिद्दी **अब-**

दुल रहिम यांनीं मराठ्यांस कुमकेस बोलाविलें. त्यावरून बाजीराव पेशवे जंजिऱ्यास आला; परंतु शाहू महाराजांनीं त्यास परत बोलाविल्यामुळें श्रीपतराव प्रतिनिधी यांस ठेवून तो साताऱ्यास निघून गेला. नंतर इ. स. १६३२ च्या मे महिन्यास हबशांची व प्रतिनिधींची लढाई झाली, तींत हबशांस जय मिळाला. नंतर प्रतिनिधीनें असें ठरविलें कीं, शेखजी सुभेदारानें हबशांचा पक्ष सोडून दिल्यास त्यांस मराठ्यांच्या आरमारावर मुख्य नेमावें; शिद्दीचा बहुतेक मुलूख त्यास मिळावा, त्याच्या भावास रायगड किल्ल्याचा किल्लेदार नेमावा आणि जय झाल्यानंतर एक लक्ष रुपये लष्करांतील लोकांस वाटावे. याप्रमाणें तह झाल्यानंतर श्रीपतराव पुण्यास गेला. नंतर इ. स. १७३३ मध्यें श्रीपतराव प्रतिनिधी आपल्या बरोबर यमाजी शिवदेव, उमाजी चव्हाण वगैरे सरदार व पुष्कळ सैन्य घेऊन जंजिऱ्यास आला, परंतु त्यास जय मिळाला नाहीं. नंतर प्रतिनिधीनें शेखाजी आंग्रे यांस मदतीस बोलाविलें; परंतु जंजिऱ्याचें काहीं नुकसान झालें नाहीं. त्यामुळें जयाजी निराश झाला, व प्रतिनिधी आपलें सैन्य घेऊन परत गेला.

इ. स. १७३३ पासून शिद्दीच्या आरमाराचें बळ कमी होत चाललें होतें. यावेळीं त्यांचे आरमार मराठ्यांशीं सामना करण्यासारखें नसून सुरतेच्या व्यापाराचें संरक्षण त्याच्याकडून होत नसे. **गबरुतखान** नांवाचा मोंगलाचा सुभेदार तेथें होता, तो स्वतंत्रपणें अंमल चालवूं लागला व शिद्दीच्या आरमाराकरितां जो मोंगलाकडून तनखा मिळत होता, त्याचा बराच भाग तो आपणाकडे घेऊं लागला. दिल्लीच्या मोंगल बादशहाची सत्ता उत्तरोत्तर कमी होत चालली होती व मराठे त्यांच्या सर्व मुलखावर स्वाऱ्या करीत होते. अशावेळीं त्यांनीं सुरतेवर स्वारी केली, परंतु इंग्लिशांनीं **गबरुतखानास** द्रव्याचा व दारूगोळ्यांचा पुरवठा केल्यामुळें त्यास जय मिळाला. नंतर इंग्लिशांनीं सुरतेच्या आरमारावरील मुख्याची जागा व त्याकरितां मिळत असलेली नेमणूक आपणास मिळण्याविषयीं गबरुतखानाशीं मागणें केलें; परंतु आरमाराचा अधिकार व नेमणूक हीं इंग्लिशांस दिलीं असतां, त्यांचें सामर्थ्य वाढून ते आरमाराची सर्व नेमणूक आपणापासून घेतील असें **गबरुतखानास** वाटून त्यानें इंग्लिशांचें मागणें कबूल केलें नाहीं, त्यामुळें इंग्लिशांस राग येऊन त्यांनीं आपलीं जहाजें तापी नदीच्या मुखावर नेऊन ठेविलीं, व

सुरतचा व्यापार बंद केला. यामुळें मवरुतखानास इतकें संकट पडलें कीं, त्यानें इंग्लिशांचें मागणें कबूल केलें. परंतु आरमाराचा अधिकार व नेमणूक आपण घेतली असतां, शिद्दीशीं जें आपलें मित्रत्वाचें नातें इ. स. १६९० पासून चालत आहे तें जाईल ह्मणून, आणि मराठ्यांची सत्ता उत्तरोत्तर वृद्धिंगत होत असतां मराठे व आंग्रे या दोन शत्रूंशिवाय आणखी एक शत्रू करणें इंग्लिशांस ठीक वाटलें नाहीं ह्मणून, त्यांनीं आपलें मागणें सोडून दिलें; आणि इ. स. १७३३ मध्यें डिसेंबरच्या ६ व्या तारखेस जंजिऱ्याच्या शिद्दीबरोबर तह केला व तो ११ व्या तारखेस कायम झाला.

जंजिरा आणि मुंबई या दोन सरकारांमध्यें मजबूत व चिरकाळ रहाणाऱ्या पायावर अक्षयी एकी आणि निष्कपट मैत्री करण्याकरितां शिद्दी साद, शिद्दी उम्मर, अफवाजी, शिद्दी मसूद आणि दुसरे मुख्य शिद्दी यांनीं इंग्लिश कंपनीचा गव्हरनर राबर्ट कावन यांजबरोबर कबूल करून असें ठरविलें कीं—

"कलम १ लें—युरोपस्थ व हिंदुस्थान, इराण, अरबस्थान आणि चीन या देशांतील राजांची प्रजा खेरीज करून आंग्र्याविरुद्ध जूट करतील आणि

समुद्रांत व जमिनीवर जोराची लढाई करून शत्रूंच्या तहाच्या कोणत्याहि बोलण्याकडे लक्ष देणार नाहींत, आणि ज्या वेळीं एखाद्या गोष्टीचें बोलणें होईल, त्या वेळीं दोन्ही सरकार हजर असल्याशिवाय दोन्ही पक्षाकडील कोणीहि एकटा तहाच्या संबंधानें कोणतीहि गोष्ट ऐकणार नाहीं, आणि दोन्ही सरकारच्या संमतीशिवाय कोणतीहि गोष्ट ठरणार नाहीं.

कलम २ रें—दोन्ही सरकारांपैकीं कोणी, एकाचा शत्रू असून दुसऱ्याशीं मित्रत्वानें असेल तर, अशा गोष्टींत ही जूट फक्त रक्षण करण्यापुरतीच ज्यावर हल्ला झाला असेल, त्यास मदत करण्यास कोणत्याहि सबबीनें चुकणार नाहीं, आणि जर एकादा हल्ला झाल्यास कुरापत काढणाऱ्याशीं ज्याची मैत्री असेल, त्यानें तंट्यांचीं कारणें मोडून काढण्याकरितां मध्यस्तीचें काम करावें.

कलम ३ रें—समुद्रांत आणि जमिनीवर आंग्रचाशीं लढाई करण्याच्या कामांत मुंबईच्या व जंजिऱ्याच्या सैन्यानीं एकत्र होऊन मुंबईच्या समुद्रांतील सर्व सैन्यानें जंजिऱ्याच्या सैन्यास मिळून असावें व त्यावर आपल्या अधिकाऱ्यांचा हुकूम चालावा, परंतु इंग्लिश सैन्याचा सेनाधिपति समुद्रांतील लढाईंत जास्त माहितगार असल्यामुळें व मुंबईचें आरमार

अमल्या कारणानें जंजिऱ्याच्या सैन्यावरील अधिकाऱ्यानें त्याच्या ताबेदाराप्रमाणें वागावें, आणि मुंबईच्या रक्षणास पुरें त्यापेक्षां जास्त शिपाई मुंबईस नसल्याकारणानें लागणारें पायदळ जंजिऱ्याच्या शिद्दीनें पुरवावें.

कलम ४ थें—तसेंच एकादा राजा दोन्ही सरकारांचा शत्रू असून त्यानें शिद्दींच्या मुलखावर स्वारी केली, तर त्यास मुंबईच्या सर्व समुद्रांतील सैन्यानें सहाय्य करावें, आणि एखादा राजा दोन्ही सरकारचा शत्रू असून त्यानें मुंबई सरकारावर स्वारी केली, तर त्यास जंजिऱ्याच्या ३० गलबतांचें व २००० शिपायांचें सहाय्य मिळावें.

कलम ५ वें–दोन्ही सरकारच्या एकत्र झालेल्या सैन्यानें समुद्रांत लढाई करून जें घेतलें असेल तें सर्व इंग्लिशांस, व जमिनीवर लढाई करून जें घेतलें असेल तें शिद्दीस, कलम ६-७ प्रमाणें दिलें जाईल.

कलम ६ वें--या जुटीस इच्छित जय देण्याची मर्जी झाली आणि दोन्ही सरकारच्या एकत्र झालेल्या सैन्यानें आंग्र्यास खांदेरी किल्ल्यांतून हांकून लाविलें, तर तें ठिकाण व त्यांत जो दारूगोळा व तोफखाना सांपडेल तो सर्व इंग्लिशांस मिळावा आणि

या शत्रूपासून जे दुसरे किल्ले हस्तगत होतील ते व त्यांतील दारूगोळा व तोफखाना शिद्दीस मिळावा. परंतु कुलाबा किल्ला व त्याचे बुरूज आणि तटबंदी हीं एका दगडावर दुसरा दगड न राहील तेथपर्यंत मोडून टाकावीं; आणि पुन्हां दोन्ही सरकारच्या मर्जी व संमतीशिवाय बांधूं नये. आणि त्या कि. ल्ल्यास जोडलेल्या मुलखाचा वसूल व उत्पन्न, व त्यांस येत असलेली खंडणी, हीं सर्व जुन्या जमीन-दारांच्या ताब्यांतील जमिनी व सरकारी इनामें शि-वाय करून समभाग ह्मणजे अर्धी इंग्लिश व अर्धी शिद्दी, यांजमध्यें दरवर्षीं विभागिली जावीं.

कलम ७ वें—कुलाबा जिल्ह्यांत नागोठणा, व पेण खाडीच्या दरम्यान म्होपत नांवाच्या जागेंत, इंग्लि-शांस ठीक वाटेल तर, त्यांनीं एक वखार व लहानसा किल्ला बांधावा; आणि त्या जागेच्या वर रस्त्यांच्या सुरक्षितपणाकरितां व व्यापार करणाऱ्या व्यापा-ऱ्यांच्या सोईकरितां, पुरे इतका दारूगोळा व रखवा-लदार शिपाई त्या किल्ल्यांत ठेवावे; आणि जकात वगैरे जें दुसरें उत्पन्न होईल तें सर्व दरवर्षीं अर्धे इंग्लिशांस व अर्धे जंजिऱ्याच्या शिद्दीस दिलें जाईल, आणि तसेंच ते किल्ला बांधण्याचा व रखवालदार शि-पायांचा खर्च सारखा देतील, आणि दोन्ही सरकार

व्यापार वृद्धिंगत करण्याकडे आणि प्रजेचें संरक्षण करण्याकडे लक्ष देतील.

कलम ८ वें–दोन्ही सरकारचा समुद्रांत व जमिनीवर या लढाईत जो दारूगोळा संपेल त्याचा खर्च ज्याचा त्यानें सोसावा, आणि एकास दुसऱ्याचा दारूगोळा घेणें जरूर वाटल्यास, त्यानें योग्य किंमत घेऊन देण्याची सवड असेल तर त्यास द्यावा.

कलम ९ वें–कोणत्याही तर्फेनें चोऱ्या केल्या असतां, ज्याचें नुकसान झालें असेल, त्यांत जें घेतलें असेल तें ताबडताब परत मिळावें.

कलम १० वें–दोन्ही सरकारांपैकीं कोणाच्याही आश्रयास एखादा अपराधी पळून आला असेल, व त्यानें जर देहांत प्रायश्चित्त मिळण्यासारखा गुन्हा केला असेल, तर तो त्यास परत देऊं नये.

कलम ११ वें–जंजिऱ्यांच्या शिद्दीनीं आंग्र्यांच्या गलबतांस व लोकांस यापुढें कोणत्याही सबबीनें आपली परवान्याची ( पासाची ) चिठ्ठी देऊं नये.

कलम १२ वें–कुलाबा व त्या खालचा मुलुख घेतल्यानंतर जर त्यावर शत्रूनें हल्ला केला, तर त्याचें संरक्षण करण्याकरितां जें सैन्य ठेवावें लागलें त्यांचा खर्च दोन्ही सरकाराकडून सारखा घेतला जाईल.

कलम १३ वें—ज्या कलमांच्या योगानें ही जूट झाली आहे, ती मंजूर झाल्यानंतर आह्मीं तावडतोब अमलांत आणावी. रज्जब महिन्याची १० वी तारीख आणि महाराणीच्या राज्याचें १६ वें वर्ष, किंवा डिसेंबर तारीख ६ सन १७३३.

गव्हरनर,

(Sd.) **राबर्ट कावन,** यांची इंग्रजी सही.

| | | | |
|---|---|---|---|
| इस्ट इंडिया कंपनीचा शिक्का. (गोल). | शिद्दी खैर्यतखान शिक्का. (गोल). | शिद्दी अबदुल रहिमानचा शिक्का. (गोल). | शिद्दी याकुत खानचा शिक्का. (गोल). |
| शिद्दी सादचा शिक्का. (गोल). | शिद्दी समूदचा शिक्का. (गोल). | शिद्दी संबुलचा शिक्का. (गोल). | शिद्दी उंमरचा शिक्का. (गोल). |

हा तह कबूल होऊन त्यावर सह्या झाल्या, त्याच दिवशीं मुंबई सरकार व शिद्दी याच्यामध्यें एक निराळाच करार झाला. तो असाः—

"शत्रू आंग्र्या यास शासन करण्याकरितां व त्याचा नाश करण्याकरितां मुंबई सरकारानें आरमार तयार करण्यांत दोन लक्ष रुपये खर्च केले, हें बादशहाच्या दरबारांत दाखवून किल्ल्याच्या व आरमाराच्या तन-

रुयाबद्दल तीन लक्ष रुपयांचा हुकूम सुरत येथील सुभेदारावर आणूं, व तो हुकूम आह्मीं मुंबई सरकारच्या स्वाधीन करूं. त्या हुकमांत असा स्पष्ट उल्लेख केला जाईल कीं, वरील पैसा सुरतच्या खजीन्यांतून मुंबई सरकारास द्यावा; आणि सुरतच्या सरकारांकडून तीन लक्ष रुपये घेतल्यानंतर ते दोन लाख रुपये घेऊन एक लाख जंजिऱ्याच्या शिद्दीस देतील.

तारीख ११ रज्जब महिना महाराणी साहेबांच्या कारकीर्दीचे १६ वें वर्ष तारीख ७ डिसेम्बर सन १७३३.

गव्हरनर,

(Sd.) **राबर्ट कावन,** यांची इंग्रजी सही.

| | | | |
|---|---|---|---|
| शिद्दी खैर्यत खानाचा शिक्का. (गोल). | शिद्दी अबदुल रहिमानचा शिक्का. (गोल). | शिद्दी याकुत खानचा शिक्का. (गोल). | इस्ट इंडिया कंपनीचा शिक्का. (गोल). |

**गबरूतखान,** शिद्दीच्या आरमारांची सर्व नेमणूक घेऊं लागला तेव्हां सल्ला मसलतीनें नेमणुकीचा पैसा मिळविण्याची शिद्दीनें तजवीज केली; परंतु **गबरूतखानानें** तो न दिल्यामुळें शिद्दीचा आरमारावरील सरदार मसूरखान यानें आपलें आरमार तापीनदीच्या मुखांत नेऊन सुरतचीं कांहीं गलबतें धरलीं.

आणि इ. स. १७३५ च्या आगष्ट महिन्यांत इंग्लिशांच्या मध्यस्तीनें नेमणुकीच्या मागील बाकीबद्दल २,४०,००० रुपायांचें व चालू सालच्या १,५०,००० रुपयांचें मागणें केलें; परंतु हा पैसा त्यानें दिला नाहीं म्हणून मसूदखानानें तेथील व्यापार बंद करून ९,००,००० रुपायांचें मागणें केलें. तेव्हां गबरुत-खानानें इंग्लिशांस मध्यस्ती करण्यास बोलाविलें, परंतु ते आले नाहींत. नंतर त्यानें इ. स. १७३६च्या फेब्रुवारी महिन्यांत शिद्दीच्या नेमणुकीचा कांहीं पैसा दिल्यानंतर शिद्दीनें धरलेलीं सर्व गलबतें त्यास परत दिलीं.

इ. स. १७३३ च्या अखेरीस बाजीराव माळ-व्यांत असतां, त्यास शाहू छत्रपतीनें आज्ञापत्र लिहिलें कीं,–तुह्मी हजार कामें एकेबाजूस ठेवून अगोदर कोंकणचा बंदोबस्त करावा. तिकडे जंजि-ऱ्याच्या शिद्दीनें फार बंडावा मांडिला आहे, तो आमच्या मुलखावर स्वाऱ्या करून खंडणी घेऊं लाग-ला आहे. त्याचा सुभेदार शेक याकुब यास श्रीपतराव प्रतिनिधीनें वश करून ठेविला होता, त्याच्या मार्फ-तीनें कांहीं राज्य करण्याची मसलत केली होती. परंतु ती सिद्धीस गेली नाहीं. प्रतिनिधीबरोबर फौजफाटा देऊन जंजिऱ्यावर पाठविलें होतें, परंतु

हबशान त्यास मार्गे लाविलें. ह्या लढाईमुळें रयतेस फार उपद्रव मात्र झाला. जंजिरा किल्ला अद्याप त्यांच्या हातीं लागला नाहीं; शिद्दीपुढें प्रतिनिधीचें कांहीं चालत नाहीं, प्रतिनिधी गोवळकोंड्याच्या किल्ल्यांत शिरले, परंतु शिद्दीनें छापा घालून तो किल्ला परत घेतला, व अशाप्रकारें त्यानें प्रतिनिधीची राळ करून टाकिली. तुमचे बंधु **चिमणाजी आप्पा** यांस त्यांच्या मदतीस जा असें वारंवार सांगितलें, परंतु ते गेले नाहींत. शेवटीं आह्मी त्यास स्वदस्तुरचें आज्ञापत्र लिहिलें कीं, तुह्मीं जात नसाल तर आह्मांस स्वतः तिकडे गेलें पाहिजे. तेव्हां त्यांनीं **पिलाजीराव जाधव** यांस पाठविलें. प्रतिनिधीस कुमक न पोचल्यामुळें ते माघारी आले. दुसरे कोणी सरदार तिकडे जाण्यास धजत नाहींत, तर तुह्मीं विलंब न करितां तावडतोब जाऊन शिद्दीचें पारिपत्य करावें. **शेख याकुब** सुभेदार आह्मांस अनुकूळ झाला आहे तो तुह्मांस उपयोगीं पडेल'.—हें पत्र पोहोंचून **बाजीराव** जंजिऱ्यास येण्याच्या पूर्वीं इ. स. १७३४ मध्यें शिद्दी **संबुल** यानें शिद्दी **हसनखान** यांस कैद करून आपण जंजीऱ्याच्या गादीवर बसला.

## शिद्दी सुंबुलखान.

(इ. स. १७३४ पासून इ. स. १७३६ पर्यंत.)

शिद्दी सुंबुल गादीवर बसून कांहीं दिवस गेल्या नंतर **बाजीराव बल्लाल** सह्याद्रीचा घाट उतरून कोंकणांत आला. तेथें त्यास शिद्दी **अबदुल रहिमान सुरूळखानाचा** दुसरा मुलगा व **शेखजी सुभेदार** हे जाऊन मिळाले. नंतर **बाजीरावानें** एकदम लढाई सुरू करून तळें व घोसाळें, येथील दोन किल्ले सर केले, तेथें त्यास प्रतिनिधी व **फत्तेसिंग** भोंसले अक्कलकोटकर हे येऊन मिळाले. **शेखजी** सुभेदारानें रायगडावरील किल्लेदार अनुकूल करून ठेविला होता, त्यामुळें तो किल्ला हस्तगत करून घेण्यास प्रतिनिधीस वेळ लागला नाहीं. **बाजीराव** राजपुरीस येत असतां, शिद्दी **रिहान** आपल्या बरोबर कांहीं स्वार घेऊन **बाजीरावावर** चाल करून गेला. उभय सैन्याची थोडा वेळ लढाई झाली. तींत शिद्दी **रिहान** यांस गोळी लागून मरण पावला, आणि शिद्दीच्या स्वारांचा **बाजीरावानें** राजपुरीपर्यंत पाठलाग केला. राजपुरीस आल्यानंतर **बाजीराव** जंजीऱ्यावर तोफा मारूं लागला. **मानाजी** आंग्रे आपली गलबतें घेऊन त्याचे मदतीस आला. त्यानें जंजिऱ्यास वेढा घालून **बाजीराव**प्रमाणेंच समुद्रांतून

तोफा मारण्याचा क्रम चालविला. या लढाईंत बाजी-रावाचें ४०,००० सैन्य होतें आणि हबशांचें २२,००० सैन्य होतें. बरेच दिवस लढाई चालली होती, परंतु किल्ला मराठ्यांच्या हस्तगत झाला नाहीं. त्याचवेळीं मराठ्यांचा त्रासामुळें खोकरी येथील वस्ती मोडून तेथील सर्व लोक मुरुडास येऊन रस्ता करून राहिले. ते पुन्हां खोकरीस गेले नाहींत. पेश-वे व आंग्रे यांनीं जंजिरा अगदीं वेढून टाकिल्यामुळें, आंतील लोकांस फार त्रास होऊं लागला, तेव्हां सर्व शिद्दी सरदारांनीं शिद्दी अबदुलरहिमान यास गादीवर बसविण्याचें कबूल करून इसवी स. १३७६ सालीं बाजीरावाबरोबर तह केला. त्यांत हबशानें रायगड, तळें, घोसाळें, बिरवाडी, आणि अवचितगड हे किल्ले मराठ्यांस देऊन अका महालापैकीं निम्मे महाल त्यांस दिले.

| पेशव्यास दिलेले महाल. | हबशांनीं ठेविलेले महाल. |
|---|---|
| १ मामले तळें. | १ प्रगणें म्हशाळे. |
| २ तप्पे निजामपूर. | २ प्रगणें नांदगांव मुरुड. |
| ३ प्रगणें घोसाळें. | ३ प्रगणें पंचतन दिवें. |
| ४ कसबे बिरवाडी | ४ तप्पे मांडलें. |
| ५ तप्पे गोरेगांव. | ५ प्रगणें श्रीवर्धन. |
| ६ गोवळ तप्याचा अ भाग | ६ गोवळ तप्याचा अ.भाग |

ह्या तह झाल्यानंतर **बाजीराव** सातान्यास गेला, याच वर्षी मानाजी आंग्र्यानें शिद्दी बसर याचें गलबत धरून कुलाब्याजवळ ठेविलें, नंतर त्यानें चौल येथील शाबा मशीद मोडण्याचा निश्चय केला. ह्या दोन कारणांनीं हबशास फार राग येऊन त्यानें आंग्र्यांवर स्वारी करण्याची तयारी चालविली. आंग्रे मशीद मोडणार असें जंजिन्यास कळतांच सर्व मुसलमानलोकांस अतीशय राग येऊन ते मोठ्या त्वेषानें लढाईस जाण्यास तयार झाले. यावेळीं अंजनवेळ किल्ल्याचा सुभेदार शिद्दी साद हाहि जंजिन्यांत आला होता. तो आपलें सर्व लष्कर व जंजिन्यांतील लष्कर व आरमार घेऊन पोंहचला. तेथें शिद्दी **बिबाल** नांवाचा हबशांचा किल्लेदार होता.

हबशांकडून शिद्दी **साद** नांवाचा सरदार लढाई करण्याकरितां उंदेरीस आला, अशी खबर **मानाजी** आंग्र्यास लागतांच त्यानेंहि आपलें लष्कर तयार केलें. इकडे शिद्दी **साद** यानें आपलें सर्व व उंदेरी वरील लष्कर घेऊन तो रेवस तेथें आला, आणि तेथें तळ देऊन त्यानें लूटफाट करण्यास सुरवात केली. इतक्यांत आंग्र्याचेंहि लष्कर येऊन दाखल झालें. उभयतां सैन्याची लढाई झाली, त्यांत आंग्र्यांस मागें हटावें लागलें. आंग्र्याच्या कित्येक लोकांस

हबशांच्या लोकांनीं धरून कैद केलें. नंतर आंग्र्यानें आपलें सर्व लष्कर हैदर नांवाच्या सरदाराबरोबर देऊन त्यास हबशांच्या सैन्यावर पाठविलें. त्यावेळीं सुभानजी घाडगे, शिद्दी याकुब सुभेदार आणि मुल्लाद सरदार, यांनीं त्याचा पराभव करून त्यास पळवून लाविलें. याप्रमाणें दोन वेळां मोड झाल्यानंतर आंग्र्यानें शाहु राजाकडे मदत मागितली. त्यानें चिमणाजी आप्पाबरोबर स्वार व लष्कर देऊन आंग्र्याच्या कुमकेस पाठविलें. हीं दोन सैन्यें एकत्र झाल्यानंतर कांबरले उर्फ श्री गांव येथ पुन्हां लढाईस सुरवात झाली. तींत शिद्दी सादच्या हातास बंदुकिची गोळी लागून तो जखमी झाला, परंतु शिद्दी याकुब सुभेदार, शिद्दी शिराज, बाळाजी दिवाण आणि कोंड नाईक यांनीं मोठा जोर धरून आपल्या लोकांस लढाई करण्याचें उत्तेजन दिलें, तेव्हां त्यांस स्फुरण चढून फारच निकराची लढाई झाली. तींत बाळाजी मारला गेला व शिद्दी शिराज व शिद्दी याकुब यांस गोळी लागून ते मरण पावले. व मराठ्यांकडीलहि बरेच लोक मारले गेले. हबशांकडील मोठमोठे सरदार पडल्यानंतर सुभानजी घाडगे व कोंड नाईक हे हातांत तरवार व पट्टा घेऊन जिवावर उदार होऊन शत्रूच्या सैन्यांत शिरले आणि बऱ्याच

लोकांची त्यांनीं कत्तल केली. हबशांच्या सैन्यास जय मिळण्याची आशा नाहीं असें पाहून, शिद्दी साद याच्या हातास जरी जखम झाली होती, तरी त्यानें मानाजी आंग्र्यास कुस्ती करण्यास बोलाविलें. दोघांची कुस्ती चालत असतां शिद्दी साद यानें मानाजीस फार दाबून धरिलें, आणि त्याच्याकडून आपल्या मरणानंतर मकानाच्या खर्चाकरितां 'पेंढाबे' गांव इनाम देण्याचें कबूल करून घेतलें.

हीं लढाई पुरी होतांच सुरतेहून मदतीकरित बोलाविलेलें लष्कर 'रेरस' येथें आलें. हें वर्तमान मानाजीस कळतांच त्यांनीं पेंढाबे गांवाची सनद करून पाठविली. तें इनाम अद्याप पर्यंत हबशांकडे चालत आहे. नंतर लढाई वगैरे कांहीं दंगाफिसाद न करितां हें लष्कर जखमी झालेल्या लोकांस बरोबर घेऊन जंजिऱ्यास आलें, नंतर शिद्दी सादच्या मुलांमाणसांस शिद्दी सुंबुल यानें अंजनवेळीहून जंजिऱ्यास आणविलें. इकडे जंजिऱ्यास शिद्दी सादचा मोड झाल्याची बातमी शिद्दी सुंबुल यास कळतांच, त्यानें त्याच्या मदतीकरितां सुलतान जबार्ति सुभेदार व शिद्दी रहान याजबरोबर लष्कर देऊन खुष्कीच्या मार्गानें पाठविलें. परंतु तिकडील लढाई आटपून आंग्रे स्वस्थ होता. त्यास या लष्क-

राची बातमी कळतांच तो आपलें लष्कर घेऊन निघाला. दोन्ही सैन्यें नवगांव येथें भेटलीं. यावेळीं आंग्र्याचें सैन्य हबशांच्या सैन्याच्या दुप्पट होतें; या लढाईंत हबशांकडील सरदार शिद्दी जबीत सुभेदार व शिद्दी रहान हे पडले व आंग्र्यास जय मिळाला.

मराठ्यांशी लढाया करून हबशांचा बराच मुलूख गेला, त्यामुळें उत्पन्न कमी झालें. नवें सैन्य ठेऊन त्याचा खर्च चालविण्यास पैसा नव्हता ह्मणून शिद्दी सुंबुल यानें असें ठरविलें कीं, शिद्दी सरदार व दुसरे नोकर लोकांस सरकारांतून जो मुशाहिरा मिळतो, त्याचा अर्धा भाग सरकारांत ठेवावा आणि ठेवलेल्या अर्ध्या भागांतून जनन, मयत, शादी, खतना, इत्यादिकडे ठराविक शिरस्ता द्यावा. बाप मयत होऊन मुलगा लहान असेल तर त्याची बाळपरवेशी सनद चालू करावी, आणि तो वयांत येऊन नोकरी करण्यासारखा असेल तर त्यास बापाची नोकरी द्यावी.

आपल्या मुशाहिऱ्यांतील अर्धा भाग सरकारांत देण्याचें शिद्दी सरदारास ठीक वाटलें नाहीं. त्यास सुंबुलचा राग आला. एके प्रसंगीं शिद्दी साद (जो यावेळीं हबस देशांतून नवीनच आला होता). शिद्दी फरंज व शिद्दी सालम असे तिघे शिद्दी सुंबुल

यांच्या दरबारांत गेले असतां, शिद्दी फरंज यानें आपला जमिया एकदम म्यानांतून काढून शिद्दी मुंबुलखानच्या मस्तकांत मारला. हें त्याचें घोर कृत्य पाहून बाकीच्या दोन हबशांनीं आपल्या तरवारींचे वार करून त्यास तेथेंच ठार मारिलें. ही गोष्ट इ. स. १७३६ सालीं घडली. शिद्दी मुंबुल यानें दोन वर्षं राज्य चालविलें. नंतर ९ महिनेपर्यंत त्यानें शिद्दी सरदारांच्या अनुमतानें कारभार चालवून इ. स. १७३७ मध्यें शिद्दी अबदुलरहिमान, मुरूलखानाचा दुसरा मुलगा यास गादीवर बसविलें.

## शिद्दी अबदुल रहिमान.

(इ. स. १७३७ पासून इ. स. १७४० पर्यंत.)

अबदुल रहिमान यांनीं चार वर्षें राज्य चालविलें. त्यानें आपल्या लग्नाच्या बायकोचा कांहीं अपराध नसतां तिचा त्याग केला, ह्मणून सर्व शिद्दी सरदारांस वाईट वाटून त्यांनीं त्यास पदच्यूत केलें; आणि त्याचा धाकटा भाऊ शिद्दी हशन जो इ. स. १७३२ सालीं गादीवर बसला होता, व ज्यास शिद्दी मुंबुल या यानें कैद केलें होतें, त्यास सन १७४० त पुन्हां गादीवर बसविलें.

## शिद्दी हशन शिद्दी मुरूळ.

(इ. स. १७४० पासून इ. स. १७४६ पर्यंत.)

याच्या कारकिर्दींत हबशांकडे असलेले गोंवळकोड व अंजनवेल हे दोन किल्ले व त्यांच्या खालचा मुलूख मराठ्यांनीं घेतला. हा मनुष्य कमी समजुतीचा व सुस्त असा शिद्दी सरदारांस वाटल्यावरून, त्यांनीं इ. स. १७४६ सांत त्यास गादीवरून काढून त्याचा भाऊ शिद्दी इभ्राम, मुरूळ खानाचा तिसरा मुलगा यास गादीवर बसविलें.

---

## शिद्दी इभ्राम.

(इ. स. १७४६ पासून इ. स. १७५८ पर्यंत.)

हा तारीख १२ आक्टोबर रविवार रोजीं गादीवर बसला. याचवर्षीं सुरतेचा मोंगल सुभेदार गबरूतखान मरण पावला, त्यामुळें तेथें बरेच तंटे फिसाद उपस्थित झाले. इंग्लिशांनीं इ. स. १७४८ सांत मिया अचन याचा पक्ष स्विकारला व सुरतच्या सुभेदारांचा अधिकारहि त्यास मिळाला. परंतु इ. स. १७५१ मध्यें सफदरखानानें डच लोकांचा आश्रय मिळवून दामाजी गायकवाड यास सुरतेचा अर्धा वसूल देण्याचें कबूल केलें; त्यावरून तो सफदरखानाच्या पक्षास मिळाला. व त्यामुळें

मिया **अचन** यास शहर सोडून किल्ल्यांत जाणें भाग पडलें, नंतर शिद्दी **मसूद** यानें किल्ला हस्तगत करून घेतल्यामुळें मिया **अचन** यांस मुंबईस जावें लागलें. आपल्या पक्षांचा अपजय झाला असें पाहून इंग्लिशांनीं पेशव्यांस मदतीस घेऊन **सफदरखान** व शिद्दी **मसूद** यांस सुरत शहरांतून घालवून त्याचा अधिकार वाटून देण्याचा घाट घातला, आणि तो हेतू साधण्याकरितां असें ठरविलें कीं, इंग्लिशांनीं आपलें आरमार घेऊन नदींतून हल्ला करावा, व पेशव्यांनीं जमिनीवरून हल्ला करावा. परंतु ही गोष्ट होण्यापूर्वींच **दामाजी** गायकवाडानें पेशव्यास सुरत शहरचा अर्धा वसूल देण्याचें कबूल करून त्याच्या विषयीं पेशव्यांच्या मनांत जें वैर होतें तें मोडून टाकिलें. त्यामुळें इंग्लिशांच्या सैन्यास मुंबईस परत जावें लागलें. इंग्लिशांचें सुरतेस बरेंच नुकसान झालें. त्याच्या गुमास्त्यास **सफदरखानानें** कैद करून गुरें व बागबगीचे स्वाधीन करून घेतलीं व मुख्य मुख्य गुमास्त्यास तह करण्यास भाग पाडलें. परंतु तो तह मुंबई सरकारानें नाकारिला आणि इ. स १७९२ मध्यें दुसरा तह केला. त्या तहानें इंग्लिशांची मालमत्ता त्यांस परत मिळाली. आणि

त्यांनीं दोन लक्ष रुपये लढाईच्या खर्चाबद्दल व जकातीच्या नुकसानीबद्दल **सफदरखानास** दिले.

इ. स. १७५३ मध्यें शिद्दी **इभ्रम** यानें **आबाजी** घाडगे नांवाच्या सरदारास आंग्र्यावर हल्ला करण्याकरितां कांहीं लष्कर देऊन पाठविलें. त्यानें थळास येऊन तेथील गढी काबीज केली. हें **मानाजीस** कळतांच तोहि सैन्य घेऊन लढाईस आला, दोन्ही पक्षांकडील लष्करांची लढाई होऊन घाडग्यास जय मिळाला. या लढाईत **मानाजी** आंग्रे यांच्या पायास बंदुकीची गोळी लागून त्यांचा पाय जखमी झाला. नंतर **मानाजीनें** पेशव्यांची मदत मागवून पुन्हां थळ येथें लढाई सुरू केली, तींत घाडग्यांचा पराजय झाला. थळ येथें ही लढाई ज्या बुरजा जवळ झाली, त्यास "**खुब लढा**" असें नांव पडलें आहे. याच वर्षीं **त्रिंबक विनायक** सुभेदार प्रांत राजपुरी, यानें दुतर्फा पाहाणी सुरू केली व ती इ. स. १७५६ सालीं पुरी झाली.

इ. स. १७५४ सालीं निजामाशीं लढण्याची पेशव्यानें तयारी केली. त्यावेळीं **मानाजीस** पेशव्यांकडून बोलावणें आल्यावरून तो तिकडे गेला. ही संधी साधून हबशांनीं आवास, सासवनें, व,

मेरं आंग्रयांच्या गांवांवर स्वारी करून तेथील द्रव्य लूटलें.

इ. स. १७५७ सालीं हबशी सरकारचा मराठ्यांच्या रयतेवर फार जुलूम होऊं लागला, तेव्हां **बाळाजी बाजीराव** पेशवे, यांनीं इ. स. १७५८ सालीं मे महिन्यांत **रामाजी महादेव** सुभेदार यांस लष्कर देऊन जंजिऱ्यावर स्वारी करण्याकरितां पाठविलें. त्यानें येऊन राजपुरीस तळ दिला आणि जंजिऱ्यांस वेढा देऊन रहदारी बंद केली. त्यामुळें किल्ल्यांतील लोक अगदीं कंटाळून गेले. हा वेढा जंजिऱ्यावर चार वर्षें होता. याच वर्षी शिद्दी सरदारांनीं शिद्दी **इभ्राम** यास तक्तावरून काढून शिद्दी **महंमद सुरूळखानाचा** साहावा मुलगा यास बसविलें.

---

## शिद्दी महमद.

(इ. स. १७५८ पासून इ. स. १७५९ पर्यंत.)

इ. स. १७५१ सालीं सुरतच्या किल्ल्यांची सत्ता मिया अचनकडून शिद्दी मसूद यानें घेतल्यानंतर तो मुंबईस येऊन राहिला होता. नंतर सात वर्षांनीं सुरतेस परत गेला आणि डिसेंबर महिन्यांत आपल्या स्वतःच्या सामर्थ्यानें आणि शिद्दी अहमद, मसूद

खानाचा मुलगा याच्या मदतीनें अली नवाजखान सुरतेस सुभेदार होता, त्यास अधिकारावरून काढून टाकिलें. नंतर शिद्दी अहमदखान याची सत्ता वाढ· ल्यामुळें तो मिया अचनचें कांहीं चालू देईना. त्यानें मिया अचन याजकडे आपल्या हाताखालील नोकर नेमण्याचाहि अधिकार ठेविला नाहीं. यामुळें मिया अचन यास राग आला व त्याच्यामध्यें व शिद्दी-मध्यें अविश्वास उत्पन्न झाला. अशा कारणांमुळें सुर-तच्या कारभारांत अगदीं अव्यवस्था होऊं लागली. मराठे सुरतेवर स्वारी करतील. अशी तेथील व्यापा-ऱ्यांस धास्ती पडली, आणि सुरतेच्या किल्ल्याचा व आरमाराचा अधिकार आपणाकडे घ्यावा अशी इंग्लि-शांस त्यांनीं विनंती केली. त्यावेळीं इंग्लिशांचें आरमार लढाई करण्यासारख्या स्थितींत असून, सुरतचा त्यांचा मुख्य अधिकारी स्पेन्सर हा फार हुशार होता. या दोन कारणांनीं मुंबई सरकारानें शिद्दी अहमद याजकडून किल्ल्याची व आरमाराची सत्ता काढून घेण्याचा प्रयत्न चालविला. हा हेतू साधण्यास मराठ्यांची अडचण येऊं नये म्हणून त्यांनीं असें ठरविलें कीं, शिद्दीच्या स्वाधीन किल्ल्याची व आरमाराची सत्ता असून त्यास सुरत शहरचें संर-क्षण करतां येत नाहीं, म्हणून शिद्दीस सुरतेच्या

होऊन त्यास तह करणें भाग पडलें. इंग्लिशांनीं मिया अचन यांस पुढीलप्रमाणें तहाचीं कलमें कळविलीं.

'कलम १ लें. फारिसखानास डेप्युटी सुभेदार नेमिलें तर, मिया अचन यानें शहरचा सुभेदार व्हावें.

व कलम २ रें, किल्ला व आरमाराचा तनखा इंग्लिशांस मिळावा.'

मिया अचननें हीं दोन्ही कलमें कबूल केल्यानंतर इ. स. १७५९ च्या मार्च महिन्याच्या ४ थ्या तारखेस तह पुरा झाला, आणि इंग्लिशांनीं त्याच वेळीं आपलें निशाण किल्ल्यावर लाविलें. नंतर मिया अचननें आंतील तटाचा मक्का दरवाजा उघडला. आणि आपलीं हत्यारें व मौल्यवान जिनसा वगैरे इंग्लिशांच्या परवानगीनें घेऊन किल्ला सोडला.

ही गोष्ट झाल्यानंतर इस्टइंडिया कंपनीच्या तर्फे स्पेन्सर साहेबानें सुरतेचें आरमार व त्याचा तनखा मिळण्याविषयीं मोंगल बादशहाकडे पुढीलप्रमाणें अर्ज केला—

"सरकारच्या मागील अधिकाऱ्यांच्या परवानगीनें इंग्लिशांनीं आजपर्यंत अनुग्रहाचा उपभोग घेतला, आणि आपला धंदा प्रतिष्ठितपणें चालविला, परंतु सध्या शिद्दीनें शहराची अमर्याद सत्ता बळका-

हून शहराचा अविच्छिन्न नाश करण्याकडे तिचा उपयोग केला. अशा प्रकारें त्यानें सरकारच्या हुकमाचें उल्लंघन केलें. सारांश शहराचें रक्षण करणें एकिकडे ठेवून उलट लोकांवर जुलूम केला. तो इतका कीं, त्यामुळें सरकारचे न्यायी हुकूम शहरांत मानले गेले नाहींत. तनख्याच्या मोबदल्याकरितां दांडा राखण्याचें काम त्यांचे असतां तें करण्यापासून तो इतका दूर होता कीं, बाळाजीरावाचा नाईक शंकराजीपंत याच्या मोठ्या आरमारानें बऱ्याच वर्षे दांडा अगदीं बंद केला, आणि त्याचप्रमाणें जमिनीवरील सैन्यानें रस्ता बंद केला व त्यामुळें शहरास व रहिवाशांस सर्व प्रकारें अडथळा झाला. असा हा इतका प्रकार झाला असतांहि शिद्दीनें त्यास अटकाव केला नाहीं, आणि आह्मी जर कांहीं त्वरेचे आणि जोराचे उपाय केले नसते, तर तुमच्या पैगंबरास भजणाऱ्या भल्या मुसलमानांचें एकच बंदर, सरकारचें प्रसिद्ध सुरत शहर, तें अप्रतिष्टेस आलें असतें. जीं संकटें त्या शहरावर आलीं, त्यापासून संरक्षण करण्यास पुरेशा सामर्थ्याचे लोक आह्मी असल्याकारणानें सर्व शहरच्या लोकांचे डोळे अशा स्थितींत आमच्याकडे लागले, त्यांनीं माझ्याकडे विनंती केल्यावरून जरी आमचा धंदा

जगाच्या ह्या भागांत व्यापार उदीम करण्याचा आहे, आणि शहरें किंवा देश घेण्याची आणि त्यांवर सत्ता करण्याची इच्छा आमची नाहीं, तरी पण ह्या ठिकाणाच्या कल्याणाकरितां आहे. असें पाहून मी या गोष्टीबद्दल मुंबईच्या सेनापतीस अशा रीतीनें लिहिलें कीं, "त्यानें अतिशय खर्च करून आमच्या राजाच्या जहाजांवर हुशार आणि अनुभविक लोकांची एक मोठी फौज, पुष्कळ दारू गोळा व लढाईचें दुसरें सामान देऊन पाठविली; तिच्या योगानें मीं शहराचें संरक्षण करून लोकांस सुखी केलें, व या ठिकाणीं सरकारचे हुकूम पूर्णपणें बजाविले जातील अशी तजवीज ठेविली. आजपर्यंत सरकारची सत्ता जशी चालत आली आहे, तशी आमच्या शक्तींतील सर्व उपायांनीं रक्षण करण्यांत येईल आणि याचप्रमाणें तुमच्या हुकमाचा स्विकार करण्याची इंग्लिशांची इच्छा आहे असें समजा. मुंबईच्या गव्हर्नरांचा व माझा असा इरादा असल्यामुळें तुमच्याकरितां आह्मी आपल्या ताब्यांत ठेविलेल्या किल्ल्याचें रक्षण करण्यास आह्मी आपलें सर्व सामर्थ्य खर्च करूं; आणि सर्व शत्रूंस न जुमानतां दांडा आणि समुद्र खुला ठेवूं. या कामाकरितां तुह्मी दिलेला तनखा आम्ही दुसऱ्या कामाकडे आजपर्यंतच्या वहि-

वाटीप्रमाणें लावणार नाहीं. आह्मीं या ठिकाणास वेढा घातलेल्या शत्रूंस काढून टाकिलें आहे. आह्मी नेहमीं किल्ल्याच्या, शहराच्या व त्यांतील रहिवाशांच्या सुद्धां संरक्षणार्थ तयार आहों. ह्मणून ऑनरेबल ईस्ट इंडिया कंपनीच्या तर्फें सरकारच्या कृपेची इच्छा करितों. या कंपनीचा यावेळीं चांगला उपयोग झाल्याबद्दल या ठिकाणच्या रहिवाशी लोकांचा अर्ज अवलोकनांत यावा."

यानंतर मोंगलाचा, जंजिऱ्याचा व इंग्लिशांचा बराच पत्रव्यवहार होऊन बादशाहाकडून तारीख ४ सप्टेंबर सन १७५९ रोजीं जाहिरनामा आला. तोः—

"लोकांस प्रसिद्ध व्हावें कीं, इंग्लिश कंपनीनें सरकारच्या कृपेची इच्छा असूं द्यावी, आणि त्यांस कळावें कीं, या यशस्वी आणि सुखाच्या दिवशीं सरकार कृपावंत व मेहरबान होऊन सुरत किल्ल्याची किल्लेदारी किंवा अधिकारी मोफेज अह्मद्खानापासून काढून त्यांस खुषीनें देत आहे, ह्मणून सरकारच्या कृपेबद्दल त्यांनीं फार कृतज्ञ राहून मुख्यत्वेंकरून हयगय न करितां किल्ल्यांचें संरक्षण करण्याकडे लक्ष द्यावें. लष्करांत योग्य बंदोबस्त आणि शिस्त ठेवावी, आणि अन्नसामुग्री व दारू

गोळा आजपर्यंत चालत आल्याप्रमाणें नेहमीं तयार ठेवावा, अशी सरकारची इच्छा आहे."

याप्रमाणें ११० वर्षे पर्यंत सुरतेस मोंगलाच्या आरमाराचा अधिकार शिद्दीकडे होता तो गेला.

इ. स. १७३१ मध्यें सुरतेस **मसूदखान** असतां, तुर्क पाटेल व दुसरे कांहीं कोळी व जाफराबादचे कांहीं गराशी यांनीं सुरतेजवळ लूटफाट केली, त्यावेळीं **मसूदखानानें शिद्दी हिलाल** यास सुरतेवरून जाणाऱ्या येणाऱ्या जहाजांचें, लुटारू लोकांपासून संरक्षण करण्याकरितां ठेविलें होतें, त्यानें तरक पाटेल वगैरे गराशी लोकास पकडून अटकेंत ठेविलें त्या लोकांजवळ द्रव्य देऊन सुटका करून घेण्यास द्रव्य नसल्याकारणानें, त्यांनीं जाफराबादच्या शिद्दीस द्रव्य देण्याचें कबूल केलें, ह्मणून शिद्दी **हिलाल** जाफराबादेस गेला आणि त्यांच्यापासून लेखी करार घेऊन तेथें इ. स. १७४९ मध्यें किल्ला बांधून राहिला. पुढें कांहीं दिवसांनीं तेथें किल्लेदार नेमून तो सुरतेस आला, परंतु इ. स. १७५९ मध्यें सुरतेचा किल्ला शिद्दीकडून इंग्लिशांकडे गेल्यामुळें तो जाफराबादेस आला.

इ. स. १७५९ मध्यें शिद्दी **हिलाल** जाफराबादेस गेल्यावर तो स्वतंत्रतेनें वागूं लागला. सुरत-

चा किल्ला व आरमाराचा तनखा आपणाकडे घेत-ल्यामुळें जंजिरे सरकारास वाईट वाटलें असेल, असें इंग्लिशांस वाटून त्याचा मोबदला देण्याचा इंग्लिशांचा विचार होता, ह्मणून यावेळीं त्यांनीं मध्यस्त पडून तह झाला.

इ. स. १७६१ मध्यें शिद्दी इभ्रामखान मरण पावल्यानंतर, शिद्दी सरदारांपैकीं शिद्दी याकुतखान सुभेदार जंजिऱ्याच्या गादीवर बसला.

---

## शिद्दी याकुत सुभेदार.

(इ. स. १७६१ पासून इ. स. १७७२ पर्यंत).

इ. स. १७६१ च्या जानेवारी महिन्याच्या तिसऱ्या तारखेस शिद्दी हिलाल, जाफराबादचे लोक आणि इंग्लिश यांच्यामध्यें तह झाला. या तहाचे वेळीं शिद्दी हिलाल यानें याकुतखान व त्याच्या गादीचे अधिकारी यांचा ताबेदार नोकर असल्याचें व त्यांचे सर्व हुकूम मानण्याचें कबूल केलें. जाफराबादचा सुभेदार नेमिलें ह्मणून ईस्टइंडिया कंपनीचे उपकार झाल्यामुळें आणि त्याचा धनी शिद्दी याकूतखान याशीं इंग्लिशांचें वजन असल्यामुळें त्यांस आपली कृतज्ञता दाखविण्याकरितां खालीं लिहिलेलीं कलमें यानें कबूल केलीं.

कलम १ लें.–हिंदुस्थानाच्या सर्व भागांत जाफ-राबादच्या लोकांशीं इंग्लिशांची मैत्री झाली.

कलम २ रें:–इंग्लिशांचे परवाने किंवा निशाणें असलेल्या कोणत्याही गलबतांस किंवा जाहाजांस बाहार दर्यांत अथवा कोणत्याहि ठिकाणीं जाफ-राबादच्या गलबताकडून त्रास पोहोंचूं नये. जाफरा-बादचीं व्यापारांचीं सर्व गलबतें शिद्दी हिलालचा परवाना आणि निशाणें असल्यास सलोख्याचीं सम-जलीं जातील.

कलम ३ रें:–उभय पक्षांचीं गलबतें व जाहाजें प्रसंगांत असल्यास आणि एकमेकांच्या बंदरांतून जात येत असल्यास, त्यांस होईल तितकी मदत मि-ळावी, व त्यांस पाहिजे तेव्हां मित्राच्या वहीवाटी-प्रमाणें जाऊं द्यावीं.

कलम ४ थें–मुंबईच्या आणि जाफराबादच्या व्यापाऱ्यांस ह्या ठिकाणीं व एकमेकांच्या ताब्यांतील इतर ठिकाणीं आतां ठरल्याप्रमाणें किंवा पुढें ठरेल त्याप्रमाणें जकात दिल्यानंतर व्यापारांची पूर्ण मोक-ळीक आहे.

कलम ५ वें:–कंपनीच्या दर्यापर्यटण करणाऱ्यां-पासून व्यापारांच्या चालीप्रमाणें खुटवा किंवा कोण-त्याहि प्रकारची फी घेण्याचा अधिकार नाहीं.

कलम ६ वें:—जाफराबाद जवळच्या मुलखांतील लोक कंपनीचे परवाने मिळविण्याकरितां जाफराबादच्या व्यापाऱ्यांचें पुष्कळ वेळां नांव सांगून लुटारूपणा करितात, ह्मणून असें ठरविलें आहे कीं, फक्त व्यापाऱ्यांस, आणि जे विश्वास ठेवण्यास योग्य आहेत अशी शिद्दी हिलालची खात्री असेल त्यांस, परवाने द्यावे आणि जे त्याचे परवाने दाखवितील त्यांसच कंपनीचे परवाने मिळतील.

कलम ७ वें:—जाफराबादच्या किंवा सुलतान पूरच्या दर्यापर्यटण करणाऱ्या गलबतास किंवा कोणत्याहि लुटारू लोकांस परवान्याची चिठ्ठी न देण्याचें शिद्दी हिलाल कबूल करतो.

कलम ८ वें:—इंग्रिजशांचा परवाना किंवा निशाण असलेल्या एखाद्या जाहाजास त्रास देतांना, अटकाव करतांना किंवा लुटतांना, जाफराबादच्या गलबतांस धरलें तर, कंपनीनें त्या गलबताची व त्यावरील खलाशांची त्यांस वाटेल त्याप्रमाणें व्यवस्था लावावी.

कलम ९ वें:—मुंबईस जिवंत जनावरांची गरज लागेल त्या वेळीं शिद्दी हिलाल यानें, योग्य किंमत घेऊन तीं पुरविण्याची मदत करावी.

कलम १० वें:—जाफराबादचा व्यापार वाढावा अशी शिद्दी हिलाल याची उत्कट इच्छा असल्या-

मुळें त्यानें जाफराबादच्या ज्या व्यापारी लोकांस आमचा परवाना मिळाला असेल त्यांस सुरत शहराशीं स्वतंत्रतेनें व्यापार करण्याची व पुरातन हक्कांचा उपभोग घेण्याची परवानगी असावी, अशी विनंती केल्यावरून असें ठरलें आहे कीं, जाफराबादच्या व्यापारी लोकांनीं सुरत हशराशीं स्वतंत्रतेनें व्यापार चालावा व पुरातन हक्कांचा उपभोग घ्यावा व त्यांच्यावर कोणत्याहि प्रकारचा जुलूम होऊं नये, अशाविषयीं इंग्लिश सरकारांतून परवानगी आणण्याबद्दल प्रेसिडेन्ट व कौन्सिल यानीं सुरतेच्या मुख्य एजंटाकडे शिफारस करावी.

कलम ११ वें:–शिद्दी हिलाल विश्वासयुक्त वचन देतो कीं, भडोच जंबुसर, खंबायत, घोगा; वगैरे बंदरास उपद्रव होऊं नये ह्मणून सलतानपूरच्या कोळी लोकांपासून करार करून घेण्यास त्यांस आणावें, आणि यासंबंधानें कोळी कबूल न झाले तर, शिद्दी हिलालनें आह्मांस मिळून आमचे आरमार व त्याची फौज यांनीं मिळून कोळ्यावर स्वारी करावी.

कलम १२ वें:–सुरत व भावनगर हीं दोन्हीं शहरें बादशाहाच्या परवान्यानें सध्यां कंपनीच्या ताब्यांत आहेत, तीं सुरत किल्ल्याच्या संरक्षणाखालीं

असल्यामुळें दोन्ही ठिकाणचे व्यापारी व रहिवासी यांचा या तहांत समावेश झाला आहे, म्हणून त्यांच्या व्यापारास किंवा शरीरांस जाफराबादच्या गलबतां-कडून किंवा सैन्याकडून इजा पोंचल्यास ऑनरेबल कंपनी त्याचा सूड उगवील.

कलम १३ वें:—शिद्दी हिलाल वचन देतो कीं, जाफराबादच्या किनाऱ्यावर किंवा जाफराबादच्या ताब्यांतील कोणत्याहि ठिकाणीं इंग्लिशांचीं जाहाजें व गलबतें फुटलीं तर, प्रसंगीच शांततेची मदत देतां येईल ती दिली जाईल. त्यांतील माल अवजारें वगैरे सामान जें हातीं लागेल तें सर्व कोणत्याहि सबबीनें त्यांतील यत्किंचित सुद्धां भाग न ठेवितां परत दिलें जाईल, आणि जाफराबादचीं व्यापारांचीं गलबतें व जहाजें शिद्दी हिलालचा परवाना व निशाण असून कंपनी सरकारच्या कोणत्याहि ठिकाणीं पडलीं तर ही कंपनी प्रसंगीं योग्य अशी जी मदत लागेल ती देण्यास कबूल आहे.

इ.स. १७१८ पासून रामजीपंत, पेशव्याकडील सुभेदार राजपुरीस तळ देऊन राहिला होता, त्यानें पोर्तुगीज लोकांची मदत घेऊन हबशांचा मुलूख हस्त-गत केला होता, त्यास घालवून देण्याचें हबशांकडन होईना. म्हणून त्यानें

इंग्लिशांस कुमकेस बोलाविलें. इंग्लिश आल्यानंतर रामाजीपंतास पानपतच्या लढाईत विश्वासराव व सदाशीवराव भाऊ हे दोन शूर सरदार लढाईत पड- ल्याचें वर्तमान समजतांच, तो पुण्यास निघून गेला.

जाफराबादचा तह झाल्यानंतर थोड्या दिवसांनीं शिद्दी हिलाल आंग्र्याकडून द्रव्य घेऊन त्यास जाफराबाद देण्याच्या विचारांत होता, हे शिद्दी याकुतखान यास कळतांच, त्यानें इ. स. १७६१ सालीं जानेवारी महिन्याच्या १९ व्या तारखेस शिद्दी मसूदचा जांवई शिद्दी याकुत यांस सुभेदाराचा अ- धिकार देण्याचा शिद्दी हिलाल यास हुकूम देऊन दाखवितांच त्यास फार राग आला, त्यानें शिद्दी याकुत यांस बांधून गलबतांत घातलें; आणि त्यांस समुद्रांत बुडविण्याचा तांडेलास हुकूम केला. परंतु तांडेलानें तसें न करतां त्यांस कोंकणच्या किनाऱ्यावर आणून सोडिलें. नंतर शिद्दी याकुत जंजिऱ्यास येऊन त्यानें याकुतखानास झालेली हकीकत जाहीर केली, आणि अशी विनंती केली कीं, माझ्याबरोबर कांहीं लष्कर द्याल तर मी त्यास जाफराबादेंतून घालवून लावीन; परंतु पेशव्यांबरोबरची लढाई नुकतीच सं- पली होती, त्यामुळें लष्कर तयार नव्हतें आणि ख- जिन्यांत शिलकहि नव्हती, म्हणून मुंबईतील व्यापा-

त्यांपासून कर्जाऊ पैसा घेऊन शिद्दी हिलाल यांस दिला. नंतर तो जाफराबाद सोडून मस्कत शहरीं गेला, आणि शिद्दी याकुतखान जाफराबादचा सुभेदार झाला. याच सुमारास आंग्र्याकडुन कांहीं लुटारू लोकांनीं गलबतांतून येऊन राजपुरीवर हल्ला केला, आणि तेथील लोकांस लुटलें. ही हकीकत शिद्दी याकुतखानास कळली असतां त्यानें लोकांचें रक्षण करण्याचा कोणताहि बंदोबस्त केला नाहीं म्हणून तेथील लोक आपलीं घरेंदारें सोडून गेले. त्यापैकीं कांहीं चौलास व कांहीं सुरतेस जाऊन राहिले. त्या वेळेपासून राजपुरीची वस्ती मोडली, व सध्यां जरी तेथें कांहीं वस्ती आहे, तरी तेथें अद्याप जुन्या घरांचें घाटें व मशीद वगैरे आहेत.

हबशी व पेशवे यांचें वैर जाऊन मित्रत्व व्हावें म्हणून इ. स. १७६१ सालीं सप्टेंबरच्या १९ व्या तारखेस माधवराव पेशव्यांच्या तर्फे शिवरामपंत तात्या आणि इंग्लिश यांच्यामध्यें जो तह झाला, त्यांत हबशी व पेशवे यांचे एकमेकाशीं असलेलें वैर जाऊन मित्रत्व व्हावें म्हणून कांहीं कलमें इंग्लिशांनीं घातलीं होतीं, तीं अशीं:–

" कलम १ लें.–रामाजीपंतानें राजपुरीवर चाल करून हल्ला करण्याच्या पूर्वी जंजिऱ्याच्या शिद्दीचा

राजपुरी प्रांत व अधिकार ज्या स्थितींत होते, त्या स्थितींत तो अधिकार व मुलूख त्यास परत देण्याकरितां योग्य मनुष्यें पाठवावीं आणि मराठ्यांच्या कोणत्याहि अम्मलदारानें यापुढें त्या मुलखास त्रास देऊं नये.

कलम २ रें.—मराठ्यांनीं किंवा शिद्दीनीं एकमेकांचे लोक कैदी केले असतील त्यांस, ह्या तहावर सही झाल्यापासून एक महिन्याच्या आंत मुंबईस पाठवावें, गव्हरनरानें त्यांची सुटका करावी, आणि शिद्दी व पेशवे यांचें वैमनस्य या वेळेपासून नाहींसें व्हावें.

कलम ३ रें.—उंदेरी किल्ला व त्याच्या खालचा मुलूख शिद्दीस परत देण्याच्या बाबतींत माधवराव पेशवे यांच्या मोठेपणावर ठेविलें आहे, आणि आमची अशी इच्छा आहे कीं, माधवराव पेशवे तो मुलूख किंवा त्याच्याबद्दल आपल्या ताब्यांतील त्या मुलखाइतकी दुसरी जमीन, शिद्दीस देतील. हा तह झाल्यानंतर त्यांतील कलमाप्रमाणें व्यवस्था लावण्याकरितां माधवरावानें, कृष्णाजी महादेव मेहेंदळे यांस पाठविलें, त्यानें दुतर्फा पाहाणी करून पूर्ववत् मुलूख वाटून दिला.

शिद्दी याकुत सुभेदार गादीवर बसण्याच्या पूर्वी, त्याचा व शिद्दी अबदुलरहिम सुरूलखानाचा सातवा

मुलगा यांच्यामध्यें कांहीं वाद होऊन शिद्दी अबदुलरहिम हा मुलूख सोडून मुशाफरी करण्याकरितां निघून गेला, परंतु त्यानें आपलीं मुलें माणसें जंजिऱ्यांत ठेविलीं होतीं, त्यांस शिद्दी याकुत गादीवर बसल्यानंतर जाच करूं लागला, म्हणून तो सुरतेहून मुंबईस आला व इंग्लिशांच्या मध्यस्थीनें आपणास गादी मिळविण्याविषयीं याकुतखानाशीं त्यानें बोलणें लाविलें; परंतु त्याचें मागणें याकुतखानानें कबूल केलें नाहीं, म्हणून तो पुण्यास गेला. नंतर इ. स. १७६८ मध्यें त्यानें पुन्हा बोलणें चालविलें, तेव्हां अबदुलरहिम यांस पेशवे मदत करतील या भयानें इंग्लिशांच्या मध्यस्तीनें शिद्दी याकुत यानें असें ठरविलें कीं, याकुतखानाच्या मरणानंतर शिद्दी अबदुलरहिम यानें गादीवर बसावें, आणि तोंपर्यंत त्यानें राजपुरीस रहावें.

शिद्दी अबदुल रहिम यांस जंजिऱ्यांत जाण्याचा प्रतिबंध असल्यामुळें त्यानें एके दिवशीं याकुतखानास कळविलें कीं, मला तुमचा चेला होण्याची फार इच्छा आहे, ही गोष्ट याकुतखानानें कबूल केल्यावरून शिद्दी अबदुल रहिम किल्ल्यांत गेला आणि याकुतखानाचा चेला झाला. नंतर याकुतखानानें त्यास राजपुरीस जाण्यास सांगितलें. परंतु अबदुल रहिम

आपल्या सासऱ्यास भेटावयाच्या निमित्तानें कांहीं वेळ जंजिऱ्यांत राहिला, नंतर त्यांनीं आपणास ताप आल्याचें निमिष करून त्यानें ती रात्र तेथेंच घालविली; परंतु त्या रात्रीं तो अर्धे रात्रीचे सुमारास उठून **खुषमहमद** जमादाराकडे गेला आणि त्यास सांगितलें कीं, हबशी भाईबंदांचा सरदार व जंजिरेकर जमादार यांचा उद्यां दरबाराच्या वेळीं **याकुतखानास** कैद करून मला गादीवर बसविण्याचा विचार आहे. सबब मेहरबानी करून या कामांत तुमचें सहाय्य असावें. त्यानें ही गोष्ट कबूल केल्यानंतर **अबदुल रहिम** जंजिरेकर जमादार व भाईबंदांचा जमादार यांजकडे जाऊन त्यांसहि तसेंच सांगितलें, आणि त्यांजपासून वचनें घेतलीं. दुसऱ्या दिवशीं दोन तास दिवसास त्यांस सदरेंत बोलाविलें व ठरलेल्या संकेताप्रमाणें **छोरवार** जमादार व जंजिरेकर जमादार यांनीं आपलें लष्कर चिरेखानी जवळच्या मैदानांत आणिलें. भाईबंदाचेंही लष्कर आल्यानंतर भाईबंदाचा जमादार व शिद्दी सरदार यांनीं शिद्दी अबदुल रहीम यांस गादीवर बसविण्याचें ठरवून शिद्दी **याकुतखान** यास कैद केलें.

---

## शिद्दी अबदुलरहीम.

( इ. स. १७७२ पासून इ. स. १७८४ पर्यंत. )

शिद्दी अबदुल सन १८८४ च्या रज्जब महिन्यांत ( आक्टोबर ) जंजिऱ्याच्या गादीवर बसला. त्यानें याच वर्षी आपणास रहाण्याकरितां राजपुरीस हवेली बांधली व खोकरीपासून मुरूडच्या दरवाज्यापर्यंत जो तट आहे त्याचें काम कोसळलें होतें तें दुरुस्त केलें. तो स्वतः रात्रीं बेरात्रीं गस्तीस फिरत असे. यापूर्वी या संस्थानच्या हुजरांत फक्त एक मुलकगिरीचें दफतर होतें व त्यावरच सर्व काम चालत असत; परंतु शिद्दी अबदूल रहीम हा गादीवर बसण्याच्या पूर्वी मुशाफरी करीत होता. त्यानें पुण्यास पेशव्याचें दफ्तर पाहिलें होतें, त्याप्रमाणें त्यानें आपल्या राज्यकारकिर्दीच्या दुसऱ्या वर्षी फडनिशी, सबनिशी, चिटनिशी, आवर्जा, अशीं निरनिराळीं दफ्तरें करून कायद्याचा चांगला बंदोबस्त ठेविला.

याच वर्षी दारूखान्याचा मुकादम कांहीं जरूरीच्या कामाकरितां दारूखान्यांत अंधार असल्यामुळें बरोबर हातफाणस घेऊन तेथें गेला होता. त्या फाणसाची ठिणगी दारूंत पडून दारूच्या भडक्याबरोबर बुरूज फुटला आणि मुकादम वगैरे तेथील सर्व लोक प्राणास मुकले !

इ. स. १७७४ सालच्या आरंभीं शिद्दी अबदुल रहिम यानें किल्ल्यांतील बऱ्याच लोकांचा—कांहीं योग्य कारण नसतां—फार छळ केला. तेव्हां त्यांनीं मदनगड किल्ल्याचा किल्लेदार शिद्दी जमरूतखान यांस ती हकीकत कळविली. त्यामुळें त्यास फार वाईट वाटून त्यानें किल्ल्यांतील कांहीं लोकांस वश करून दिघीच्या किनाऱ्यापासून ह्मसळ्यापर्यंत चौक्या ठेवून ह्मसळें, गोवेलें, व दिवे या माहालाकडील जमाबंदीचा सर्व वसूल बळकाविला, आणि जंजिरा किल्ल्यांतील सुभेदार शिद्दी जव्हर यानें श्रीवर्धन, व मांडलें या दोन महालाकडील सर्व वसूल घेतला. तेव्हां अबदुल रहिम यानें इंग्लिशांची मदत मागितली आणि शिद्दी जमरूतखान यानें पेशव्यांची मदत मागितली ती त्यास मिळाली नाहीं. इंग्लिशांनीं इंकिन साहेबांबरोबर सैन्य देऊन अबदुल रहीम यास मदत देण्याकरितां जंजिऱ्यास पाठविलें. तें सैन्य जंजिऱ्यास आल्यानंतर शिद्दी अबदुल रहिम राजपुरीस असलेलें आपलें सर्व सैन्य घेऊन मदगडास गेला, आणि किल्ल्यापासून कांहीं अंतरावर तळ दिला. दुसरे दिवशीं लढाई सुरू झाली. इंग्लिशांचें सैन्य पुरें असल्यामुळें त्यांचे बरेच लोक मेले. अबदुलरहिमच्या सैन्याचा व्हावा तसा उपयोग झाला नाहीं,

म्हणून डेंकिन साहेबानें लढाई सोडून आपलें सैन्य राजपुरीस आणलें, आणि तेथून सैन्यासह मुंबईस निघून गेला. शिद्दी जमरूत व शिद्दी जव्हर यांनीं पळकावलेली सत्ता पुन्हा आपल्यास मिळत नाहीं, असें पाहून शिद्दी अबदुल रहिम यास फार वाईट वाटून तो आजारी पडला, आणि इ. स. १७८४ सालीं मोहरमच्या १६ व्या तारखेस मरण पावला. यास शिद्दी अबदुलकरीम उर्फ बाळूमिया व शिद्दी अल्ली असे दोन मुलगे होते आणि दोन मुली होत्या. त्यांपैकीं सोनुबिबी ही शिद्दी जव्हर, जंजिऱ्यांतील सुभेदार यास दिली होती.

## शिद्दी जव्हर.

( इ. स. १७८४ पासून इ. स. १७८७ पर्यंत )

शिद्दी अबदुल रहिम याचा थोरला मुलगा बाळूमिया हा स्वभावानें फार रागीट असल्यामुळें शिद्दी सरदार व हबशी भाईबंद हे त्यास गादीवर बसविण्यास खुषी नव्हते, म्हणून तो जंजिरा सोडून आपल्या बापाच्या हवेलींत राजपुरी येथें राहत होता; याचा धाकटा भाऊ शिद्दी अल्ली जंजिऱ्यांत होता, यास गादीवर बसण्यास शिद्दी जव्हर यानें सांगितलें, परंतु वडील भाऊ असतां गादीवर बसण्याचें

त्यानें नाकारिलें. तेव्हां राज्याचा सर्व कारभार शिद्दी जव्हर पाहूं लागला.

शिद्दी अल्ली, आपल्या बापाची मालमत्ता जंजिऱ्यांत होती ती घेऊन राजपुरीस आला, आणि सर्व मत्ता त्यानें आपला भाऊ बाळूमिया याच्या स्वाधीन केली, नंतर बाळूमिया यास राजपुरीस राहणें ठीक न वाटल्यामुळें, तो आपलीं सर्व मुलेंमाणसें व मालमत्ता घेऊन हरणईस निघून गेला. तेथून त्यास परत आणण्याविषयीं शिद्दी जव्हर यानें पुष्कळ प्रयत्न केला; परंतु तो आला नाहीं. नंतर पेशव्यांस भेटण्याकरितां तो पुण्यास गेला; तेथें गेल्यानंतर पेशव्यास भेटला, आणि त्यास जंजिऱ्याची सर्व हकीकत कळवून आपणास जंजिऱ्याच्या गादीवर बसविण्याकरितां कुमक मिळण्याविषयीं बोलणें लाविलें. नानाफडणवीस यांस कोणत्या तरी निमित्तानें जंजिरा घ्यावयाचा होता, ह्मणून बाळूमियास मदत देण्याचें त्यानें कबूल केलें. परंतु हा विचार लौकरच बदलून पुन्हा असें ठरलें कीं, बाळूमियानें जंजिऱ्याचा सर्व हक्क पेशव्यांस द्यावा आणि त्याबद्दल पेशव्यांनीं त्यास आपल्या राज्यांतील पाऊण लाख रुपयांचा मुलूख द्यावा. या गोष्टीचा लेखी करार इ० स० १७९१ सालांत जून महिन्याच्या ६ व्या तारखेस होऊन पेशवे व बाळूमिया

यांस तो मान्य झाला. पेशवे बाळूमियास मदत करणार, ही बातमी शिद्दी जव्हर यांस कळतांच त्यानें इंग्रिशांची मदत मागितली आणि असें सांगितलें कीं, माझ्याजवळ एक मनुष्य आणि जंजिऱ्याचा खडक राहीपर्यंत मी लढाई करीन. परंतु याकामीं इंग्लिश मध्यस्ती पडल्यामुळें लढाईचा प्रसंगच आला नाहीं.

पेशव्यांनीं लेखी कराराकेल्याप्रमाणें बाळूमिया यास प्रथम खोराशी तालुक्यांतील १७ गांव दिले, त्याचें उत्पन्न साठ हजार रुपये होतें. त्यामुळें बाकी १९ हजार रुपये रोख पांच वर्षेपर्यंत बाळूमियास पेशव्यांकडून येत होते. पुढें लाचपूर तालुक्यांतील तीन गांव त्यांनीं दिले, तत्राप ठरलेल्या रकमेची भर झाली नाहीं; व जंजिरा आपल्या हातांत मिळण्याची आशा राहिली नाहीं, असें पेशव्यांनीं पाहून बाकीची रक्कम त्यास दिली नाहीं.

बाळूमिया सुरतेस रहात होता, तथ कांहीं दिवस राहिल्यानंतर सचीनचा किल्ला, येथें त्यानें आपलें राहण्याचें मुख्य ठिकाण केलें होतें. नंतर दिल्लीचा बादशाह दुसरा शाहाअलम यास नजराणा पाठवून नबाब असा त्यानें आपणास किताब मिळविला. कांहीं दिवसांनीं तो लाचपूर येथें राहाण्यास गेला आणि तेथें तो. इ. स. १८०२ मध्यें मरण पावला.

त्यास सात मुलगे होते, त्यांत थोरला मुलगा शिद्दी इभ्राम हा त्याच्यानंतर गादीवर बसला. हा फार चैनी व दानधार्मिक असल्यामुळें खजिन्यांतील सर्व पैसा खर्च करून त्यानें १३,२८,२३५ तेरा लक्ष, अठ्ठावीस हजार, दोनशें पस्तीस रुपायांचें कर्ज केलें होतें. हें कर्ज फेडण्याकरितां त्याच्या सांगण्यावरून इंग्लिशांनीं इ. स. १८३५ मध्यें राज्यकारभार आपल्या हातीं घेऊन त्यास सचीन आणि लाचपूर ह्या दोन गांवांचें उत्पन्न १८००० चें त्याच्या खासगी खर्चास दिलें. बाकीच्या सर्व गांवांची व्यवस्था सुरतचा जिल्हा जज्ज, एजंट या नात्यानें पाहात असे. या व्यवस्थेमुळें दर वर्षी ६७००० ची रक्कम फेडीकडे लागत असे.

इ. स. १७५३ मध्यें शिद्दी इभ्राम मरण पावला, आणि त्याचा मुलगा शिद्दी अबदुलकरीम गादीवर बसला. पुढें इ. स. १७५२ मध्यें इंग्लिशांनीं निमेपेक्षां जास्त कर्ज फेडल्यानंतर सर्व मुलूख नबाबाच्या स्वाधीन केला, आणि राहिलें कर्ज फिटेपर्यंत दर वर्षास ३५००० हजार रुपये देण्याचें वचन घेतलें. इ. स. १७६८ मध्यें शिद्दी अबदुलकरीम मरण पावला आणि त्याचा मुलगा गादीवर बसला. पांच वर्षें राज्य

करून इ. स. १७७३ मध्यें मरण पावला, तेव्हां त्याचें वय फक्त ९ वर्षांचें होतें.

इ. स. १७८९ सालीं जंजिऱ्याच्या तर्फे शिद्दी जमरुतखान मंदगड किल्ल्याचा सुभेदार आणि पेशव्याच्या तर्फे भिकाजी गोविंद ठोसर सुभेदार होता, तेव्हां किल्ले विसापूर यांनीं दुतर्फी पाहणी करण्याचें ठरविलें. त्या कामांत पेशव्यांकडून महाराजा रघुनाथ काळे व हबशांच्या तर्फे गुलाम बाहुदिन बक्षी हे होते.

इ. स. १७८७ पासून शिद्दी जव्हर राजाकारभार चालवीत होता, परंतु गादीचा मालक कोणीही नव्हता. इ. स. १७८९ पर्यंत काम चालविल्यानंतर सर्व शिद्दी सरदारांस व शिद्दी जव्हर यांस वाटलें कीं, कोणास तरी गादीवर बसवावें, म्हणून शिद्दी हसनच्या तीन मुलांपैकीं कोणास तरी कायम करावें असें कायम ठरलें. दोन मुलगे शिद्दी महमदखान व शिद्दी दाउदखान हे दुर्व्यसनी असल्या कारणानें गादीवर बसविण्यास योग्य नव्हते, म्हणून सर्वांत धाकटा मुलगा शिद्दी इब्राइमखान यास गादीवर बसविण्याचा विचार झाला. ही बातमी शिद्दी अबदुलरहिम याची मुलगी सोनुबीबी हीस कळतांच तिनें आपला नवरा शिद्दी जव्हर यांस

सांगितलें की, माझा चुलतभाऊ शिद्दी इब्राइमखान हा जर गादीवर बसला तर सर्व शिद्दी सरदार व हबशी भाईबंद यांस तो फार त्रास देईल. कारण त्यांनीं त्याच्या बापास दोन वेळां गादीवरून काढिलें आहे. तो राग अद्याप त्याच्या मनांत घोळत आहे, सबब त्याचा सूड उगाविल्याशिवाय तो कधींही रहाणार नाहीं; तरी गादीवर ज्यास बसवावयाचें तो चांगला हुशार व आपल्या प्रजेचें कल्याण करण्यास मनापासून झटणारा असा असावा. त्यास गादीवर बसविण्यापेक्षां तुह्मीच गादीचे मालक व्हा. असें जर न झालें तर मी आत्मघात करून घेईन.—तेव्हां इब्राइमखान यास गादीवर बसविण्याचा विचार तहकूब करून शिद्दी जव्हर यानें सर्व शिद्दी सरदारांस सांगितलें कीं,—पुढील रवीवारीं गादीवर कोणास बसवावें त्याचा निर्णय करण्यांत येईल. नंतर चार पांच दिवसांनीं शिद्दी जव्हर यानें सर्व शिद्दी सरदारांस बोलावून शिद्दी इब्राइम यांस गादीवर न बसविण्याचें कारण सांगितलें. तेव्हां त्यांनीं शिद्दी जव्हर यांस गादीचा अधिकार स्विकारण्याची विनंती केली, ती त्यानें मान्य केली, आणि इ. स. १७८७ सालीं तारीख २२ एप्रील वैशाख शुद्ध ४ रविवार रोजीं तो तक्तारूढ झाला.

---

## शिद्दी जव्हर.

(इ. स. १७८७ पासून इ. स. १७८९ पर्यंत.)

इ. स. १७७४ पासून मदगड किल्ल्याचा सुभेदार शिद्दी जमरूतखान यानें म्हसळे, गोवेले, आणि दिवे या तीन टप्प्यांचा वसूल बळकाविला होता, व तो अद्याप तोच घेत होता, यामुळें जंजिरा संस्थानच्या खाजिन्यांत तो आणण्याचा कोणता उपाय करावा, हा शिद्दी जव्हर यांस मोठा विचार पडला. नंतर त्यानें शिद्दी जमरूतखान यास कळविलें कीं, आतां मी जंजिऱ्याच्या गादीवर काईम झालों आहें, तेव्हां आपण एकवेळ मला येऊन भेटाल अशी फार इच्छा आहे. शिद्दी जमरूतखान मदगडाहून आला व उभयतांची भेट झाली तेव्हां शिद्दी जव्हर यानें सांगितलें कीं, शिद्दी अबदुलरहिम याच्या त्रासामुळें आपणास निरनिराळ्या जागा धरून राहणें भाग पडलें, अ तां ईश्वर कृपेनें ही सत्ता मला मिळाली आहे. माझ्याकडून रयतेस त्रास होणार नाहीं, मी त्यांचें चांगलें संगोपन करीन, तुह्मी आह्मी एकच आहों, आणि एक विचारानें राहूं. नंतर शिद्दी जमरूतखान मदगडास जावयास निघाला तेव्हां शिद्दी जव्हर यानें त्यास असें सांगितलें कीं, सोनुबीबी साहेबाची तुमच्या बीबी साहेबास भेटण्याची फार इच्छा आहे,

करितां मदगडास पोंहचतांच तुम्ही त्यांस इकडे पाठविण्याची मेहरबानी करावी. त्यावरून शिद्दी जमरूत मदगडास गेल्यानंतर त्यानें आपल्या बायकोस जंजिऱ्यास पाठविलें. कांहीं दिवस जंजिऱ्यांत राहून नंतर ती मदगडास जाण्यास निघाली. त्यावेळीं शिद्दी जव्हर यानें तीस प्रतिबंद केला, आणि शिद्दी जमरूतखान यास कळविलें कीं, तुमच्या आमच्यांत वेगळेपणा नसावा. हा मुलूख पूर्वी पासून एकाच गादीच्या अमलांत होता, त्याच प्रमाणें पुढें असावा, अशी आमची इच्छा आहे. म्हसले, गोवेले आणि दिवे या तीन टप्प्यांचा वसूल आपण बरींच वर्षे घेत आहां, तो या पुढें न घेतां इकडे पाठवीत जावा. हें कबूल होत असेल तर आपल्या बायकोस मदगडास जाण्याची मोकळीक मिळेल. अशा प्रकारें पेचांत सांपडल्यामुळें शिद्दी जमरूत यानें निरुपाय होऊन शिद्दी जव्हरचें बोलणें कबूल केलें, आणि तो त्याच्या हुकमतींत राहूं लागला.

पुढें थोड्या दिवसांनीं शिद्दी जव्हर आजारी पडला, त्यानें शिद्दी जमरूतखान यांस भेटण्यास बोलाविलें, परंतु तो राजपुरीस आला तेव्हां त्यास शिद्दी जव्हर निवर्तल्याची बातमी समजली. त्यानें

प्रेत राजपुरीस दफनावण्याकरितां येईल अशा वि-चारानें तो राजपुरीस राहिला, परंतु शिद्दी जव्हर यानें आपल्या मरणापूर्वी आपलें प्रेत जंजिऱ्यांत जुमामशिदीच्या जवळ शिद्दी याकुतखान सुभेदार यांच्या बाजूस दफनावण्यास सांगितलें होतें, त्यामुळें तें तेथें दफनाविलें. नंतर एक महिना सोळा दिवसपर्यंत राज्यकारभार शिद्दी इभ्राइम यानें केला. त्यास ता. १ मे शाबान महिन्याच्या १९ व्या तारखेस रविवारीं सकाळीं गादीवर बसविलें. नंतर शिद्दी जमरूत-खान राज्यकारभाराचें काम करूं लागला. यापूर्वी जंजिऱ्याचे आरंभीं प्रधान उपनावाचे दिवाण होते. नंतर कर्णीकांचे वंशांतील भिकाजी महादाजी व जगन्नाथ भिकाजी हे दिवाण होते, नंतर गुप्ते यांचे घराण्याकडे दिवाणगिरी होती.

---

## शिद्दी इभ्राइमखान.

( इ. स. १७८९ पासून इ. स. १७९४ पर्यंत. )

इ. स. १७८९ सालीं जी पाहाणी झाली तींत हबशी सरकारचा बराच फायदा केला, म्हणून शिद्दी इभ्राइमखानानें शिद्दी जमरुत यास इ. स १७९१ सालीं आपला मुत्सदी केलें.

पेशव्यांच्या दरबारांत वामनराव जनार्दन हबशी सरकारच्या तर्फे वकील होता, त्यानें पेशव्यांकडून श्रीवर्धन, गोवेले, व ह्मसळे या तीन टप्यांचें गांव कुळकर्णीपणाचें वतन आपणाकडे करून घेण्याविषयीं पेशव्यांची यादी जंजिरे सरकारांस आणिली, त्यावरून तें वतन तेव्हांपासून त्यांच्याकडे चालू झालें. नंतर पेशव्यांकडे माडल टप्यांपैकीं राहिलेलें गांव कुळकर्णीपणाचें वतन **सदाशिव अनंत** यानें आपणाकडे करून घेण्याची यादी **सवाई माधवराव** पेशवे यांजकडून इ. स. १७९२ तारीख २५ सप्टेंबर १ सफर रोजीं आणून तें वतन आपणाकडे करून घेतलें. यांनीं इंग्लिश व पेशवे या दोन सरकारांशीं हबशी सरकारांचें सख्य राहण्यासाठीं फार मेहेनत घेतली, ह्मणून त्यास इ. स. १७९४ सालीं [रज्जब महिन्याच्या १९ व्या तारखेस] फेब्रुवारी महिन्याच्या २० व्या तारखेस, शिद्दी **इब्राइमखान** यानें सव्वा साडेचार खंडी धान्याची जमीन वंशपरंपरेनें इनामाची सनद करून दिली.

यावेळीं शिद्दी **जमरूतखान** आपलें वर्चस्व विचारावांचून करीत असे त्यामुळें शिद्दी इब्राईम यास वाईट वाटून त्यानें शिद्दी **जमरूतखान** यास कैद करण्याचा घाट घातला, परंतु हें शिद्दी **जमरूत**-

खान यांस कळतांच त्यानें शिद्दी इब्राइमखानाच्या हवेलीस तारीख ९ आक्टोबर तारीख १४ रबिलावल रोजीं वेढा घालून त्यास कैद केलें. नंतर १७ दिवस पर्यंत शिद्दी सरदारांच्या सल्यानें राज्यकारभाराचें काम करून, आपण तारीख १६ डिसेंबर तारीख ४ रबिलाखर रोजीं गादीवर बसला.

---

## शिद्दी जमरूतखान.

(इ. स. १७९४ पासून इ. स. १८०३ पर्यंत.)

शिद्दी जमरूतखान गादीवर बसला, त्याच वर्षी पहिला राघोजीराव आंग्रे याचा मुलगा दुसरा मानाजीराव आंग्रे कुलाब्याच्या गादीवर बसला. त्यावेळीं त्याचें वय आठ वर्षांचें होतें, ह्मणून त्याचा सावत्र भाऊ जयसिंगराव आंग्रे सर्व कारभार पहात असे. परंतु पुढें मानाजीची आई आनंदीबाई हिच्या मनांत जयसिंगरावाविषयीं द्वेष उत्पन्न होऊन तिनें कांहीं लोकांच्या मदतीनें त्यास ठार मारण्याचा प्रयत्न केला. परंतु तो व्यर्थ गेल्यामुळें जयसिंगरावाचे प्राण वाचले. पुढें त्या उभयतांचें ऐक्य करण्याकरितां आनंदीबाईनें हबशी सरकारांस बोलाविलें. तेव्हां शिद्दी जमरूतखान यानें आपलें आरमार व लष्कर देऊन एका सुभेदारास तिकडे पाठविलें. त्यानें आनंदीबाई

जयसिंगराव आंग्रे यांजमधील तंटा मोडून ऐक्य केलें. याबद्दल आंग्र्यानें चांदीच्या दोन समया, उदबत्तीचीं दोन झाडें, आणि एक झुंबर, इतकीं हबशी सरकारांस नजराणा दिलीं; आणि सुभेदारांस शिरपाव दिला. त्या समया व उदबत्तींचीं झाडें अद्याप तोशखान्यांत[1] आहेत.

शिदी इभ्राईम कारागृहांत असतां सदाशीव अनंत त्याची भेट घेत असे. एके दिवशीं जेवणाच्यावेळीं तो भेटीस गेला तेव्हां, शिदी इभ्राइमच्या पुढें असलेलें जेवण फार कनिष्ट प्रतीचें होतें. तें पाहून सदाशीव अनंत यास फार वाईट वाटलें, आणि त्याचवेळीं शिदी जमरूत याजकडे जाऊन त्याचे सर्व अहवाल त्यानें सांगितले; आणि विनंती करून मोठ्या युक्तीनें तेलवडे, तर्फ मुरुड हा गांव शिदी इभ्राइम याच्या खर्चास इनाम करून देवविला. त्याचवेळीं इनामतीची सनद तारीख २२ रविलाखर इ. स. १७९७ रोजीं लिहून मोहर शिक्का करून ती शिदी इभ्राइम यास आणून दिली. हे सदाशीव अनंतनें

१ तोशीखाना=जवाहीर, सोनें, रुपें, वगैरे दागिने व जर जरतारी कापड वगैरे ठेवण्याचें ठिकाण. सदरहु समयांपैकीं एक समई हल्लींचे नामदार बेगमसाहेब वापरीत आहेत. यांस इंडीयन क्युरिआसिटीबद्दल फारच शोख आहे.

कृत्य पाहून त्यास फार आनंद झाला, आणि त्यानें त्यास वचन दिलें कीं, ईश्वरानें मला चांगले दिवस दाखविले तर मी तुला कधींहि विसरणार नाहीं.

सदाशीव अनंत याच्याविरुद्ध कांहीं लोक होते त्यांनीं जमरूतखान यास असें सांगितलें कीं, पेशव्यांस कांहीं मुलूख देण्याचें कबूल करून शिद्दी इभ्राइम यास गादीवर बसविण्याचा सदाशीव अनंत यानें घाट घातला आहे हें शिद्दी जमरूतखान यास कळतांच त्यानें सदाशीव अनंत यास धरून जिवें मारण्याचा निश्चय केला, परंतु हें त्यास कळतांच तो रातोरात पेशवाई अमलांत चण्हेर बिरवाडी येथें गेला. नंतर सर्व कारभार लक्ष्मण महादेव दिवाण पहात होता. परंतु त्यांचें काम जमरूदखानाच्या मनास येईना या वेळीं इंग्लिशांची टिपूसुलतानाबरोबर लढाई चालली होती, त्यामुळें त्यांच्याकडून हबशांस मदत मिळणार नाहीं, असें पेशव्यांस वाटल्यावरून त्यांचा विचार जंजिऱ्यावर स्वारी करण्याचा आहे, असें जमरूतखानाच्या कानावर येऊं लागलें. राज्यकारभार नीट चालेना तेव्हां तारीख २७ मोहरम तारीख ११ जुलई इ. स. १७९८ रोजीं जमरूतखानानें मोहरखुद कौल देऊन सदाशीव अनंत यास बिरवाडीहून आणिलें, व सर्व

कारभार त्याजकडे दिला, आणि लक्षुमण महादेव यांस चिटणीसीचें काम करण्यास सांगितलें.

इ. स. १८०१ मध्यें पेशव्यांकडून खंडेराव रास्ते जंजिऱ्यावर स्वारी करण्याकरितां आला. त्यानें आपल्या सैन्याचे दोन भाग करून एक भाग म्हसळ्याकडे पाठविला. त्या सैन्यानें गायमुखाजवळ तळ दिला. तेव्हां शिद्दी जमरूतखानानें सय्यद उंमर सय्यद इभ्राइम सुभेदार चिराकशा व समशेरखान जमादार, यांस लष्करासह तेथें पाठविलें. दोन्ही सैन्यांची गांठ म्हसळ्यास पडून थोडी लढाई झाल्यानंतर, पेशव्याच्या लष्करानें म्हसळ्यास आग लावून दिली. हबशांचें सैन्य इकडे गुंतलें आहे, असें पाहून खंडेराव रास्ते सैन्यासह मांडले तर्ण्याच्या बोर्लईस येऊन तेथें त्यानें तळ दिला. हें शिद्दी जमरूतखान यांस कळतांच त्यानें शिद्दी महंमद शेखानी सुभेदार व सदाशीव अनंत यांस म्हसळ्यास पाठविलें.

सदाशीव अनंत मुत्सद्दी आणि हैबतराव बुरूणकर यांच्याबरोबर सैन्य व दारू गोळा देऊन बोर्लईस पाठविलें. तेथें कांहीं वेळ लढाई झाली. यावेळीं हबशांकडील सैन्य थोडें असून त्याचे दोन भाग करावे लागले. त्यामुळें यशाची खात्री नव्हती

ह्मणून सदाशीव अनंत यानें तहाचें बोलणें लाविलें; परंतु हा तह पुरा होण्यापूर्वी यशवंतराव होळकरानें पुण्यावर स्वारी करून पेशव्यांची गादी बळकाविली. त्यामुळें तो पुण्यास निघून गेला. या लढाईत सदाशीव अनंत याचा फार उपयोग झाला, ह्मणून तो चव्हेरास गेल्यापासून त्यांस दिलेलें जें इनाम सरकारांत अनामत होतें, तें यावेळीं जमरूत खानानें त्यास परत दिलें.

इ. स. १८०३ तारीख २३ नोवेम्बर तारीख ८ शाबान गुरुवारी रोजीं दोन प्रहरीं, एका मुलानें फटाकरी पेटवून अंबारी कोटारावरील झाप्यावर फेंकली, त्यामुळें झाप्यानें पेट घेतली. ती आग फार न होतां वाऱ्याच्या जोरामुळें इतकी जलद भडकली कीं, किल्यांतील बहुतेक इमारती व लहानसान घरें दारें थोड्या वेळांत जळून जमिनदोस्त झालीं. किल्यांत जिकडे तिकडे आगीचा भडका झाल्यामुळें कित्येक मनुष्यें प्राण्यास मुकलीं. फक्त नोगजी शिद्दी इब्राइमखानाची हवेली, जमातखाना, आणि बाबाळुमियाची हवेली ह्या चार इमारती मात्र सुरक्षित राहिल्या. या वेळीं शिद्दी जमरूतखान दुखणाईत होता व त्यास बाळुमियाच्या हवेलींत आणून ठेविलें होतें. आगीच्या भयंकर गोष्टीमुळें त्याचें दुखणें वाढून तो

(तारीख १७ शाबान) तारीख १२ डिसेंबर शुक्रवार रोजीं मरण पावला. यावेळीं त्याचे मुलगे अबदुलरहीम उर्फ बाबासाहेब व शिद्दी शिलेमान हे हयात होते.

जंजिऱ्यास आग लागल्यामुळें बहुतेक इमारती व घरेंदारें जळून गेलीं होतीं; इतकेंच नाहीं, परंतु भाताचें दास्तानही जळाल्यामुळें अन्न सामुग्री किल्ल्यांत मुळींच राहिली नाहीं. लोकांची मालमत्ता व घरेंदारें जळून गेल्यामुळें रहाण्याची फार अडचण पडूं लागली. तिजोरींतील सर्व पैका गढून गेल्याकारणानें द्रव्यद्वारा सरकारांतून लोकांस मदत मिळण्याची आशा राहिली नाहीं. अशा वेळीं गादीवर बसण्याचें कोणी कबूल करीना, तेव्हां सर्व शिद्दी सरदारांनीं सदाशीव अनंत यास, शिद्दी इब्राहीम—ज्याला जमरूतखानानें कैद केलें होतें,—त्याच्याकडे पाठविलें, परंतु तोही या गोष्टीस कबूल होईना. पण सदाशीव अनंत याच्यावर त्याचा फार विश्वास होता म्हणून त्यानें इब्राइमखानास सांगितलें कीं, राज्याच्या खबरदारीबद्दल व दफ्तरांच्या व्यवस्थेबद्दल सर्व जोखीमदारी मी आपल्याकडे घेतों, तुम्ही कांहींएक संशय मनांत न आणतां गादीचा स्वीकार करावा. तेव्हां शिद्दी इब्राइमखानानें गादीवर बसण्याचें कबूल केलें, आणि सर्व

शिद्दी सरदारांपासून असा करार करून घेतला कीं, मी गादीवर बसल्यानंतर माझ्यामागें माझ्या वंशावांचून दुसऱ्या कोणासही गादीवर बसवूं नये, व दुसऱ्यास बसविण्यास जो कोणी प्रयत्न करील त्यांस शिक्षा केली जाईल. याप्रमाणें करार झाल्यानंतर (तारीख १९ शाबान) तारीख ४ डिसेंबर रविवार रोजीं सकाळीं, शिद्दी इब्राम्हइखान यांस गादीवर बसविलें.

---

## शिद्दी इब्राइमखान.

(इ.स. १८०३ पासून इ.स. १८२९ पर्यंत.)

गादीवर बसण्यापूर्वी शिद्दी इब्राइमखान यानें शिद्दी सरदारांस वचन दिल्याप्रमाणें खानदान (भाऊबंद) हबशी भाईबंद, जंजीरकर, छोरवाद, सुभेकरी, कारकून, मदगडकर, जुने घरंदाज याप्रमाणें सर्वांस आजपर्यंत ज्याप्रमाणें इनामें व शिरस्ते होतीं तशीं चालू केलीं. यावेळीं सर्व राज्यकारभार **सदाशीव अनंत** चालवित होता. त्यानें माहालोमहालच्या सर्व सनदा आणून बराच गल्ला किल्ल्यांत आणून ठेविला, आणि जंजिऱ्यांतील लोकांस अन्न पुरविलें. त्यानें राज्यकारभार फार चांगला चालविला, ह्मणून सरकारानें

त्यास गळ्यांतील कंठी, पागोटें, शेला, आणि ताड-पत्री इनाम दिली.

शिद्दी **इभ्राइमखान** गादीवर बसल्यानंतर दुसऱ्या वर्षी **लक्षुमण माहादाजी** दिवाण यानें कांहीं लोकांस अनुकूळ करून शिद्दी **इभ्राइमखान** यांस ठार मारून शिद्दी जमरूतखानाचा मुलगा शिद्दी अबदुलरहिम उर्फ बाबासाहेब, यांस गादीवर बसवून सर्व राज्यकारभार आपल्या हातीं घेण्याचा यत्न चालविला. या कामासाठीं त्यानें कांहीं लष्कर फितूर केलें. ह्या बंडाची खबर **सुर्याजी नाईक भाटकर** याजकडून शिद्दी **इभ्राइमखान** यास लागली. बंडवाल्या मंडळीच्या सर्व मसलती **अनाजी सबनीस** याच्या वाडींत होत असत, ह्मणून तेथें अबदल्ला कारभारी यास गुप्तपणें पाठविलें. त्यानें बंडांतील लोकांच्या सर्व मसलती शिद्दी इभ्राइमखानास कळविल्या, तेंव्हां बंडांतील सर्व लोकांस धरून आणण्याविषयीं त्यानें हुकूम केला. धरलेल्या लोकांस शिद्दी **इभ्राइमखान** यांच्या पुढें आणल्यानंतर ते सर्व कबूल आले. नंतर त्यानें **लक्षुमण महादाजी** दिवाण यांस छल करून मारिलें. **बळवंतराव** कुळकर्णी व **अनाजी सबनीस** यांचीं डोकीं बिबी हजानी समोर मारविलीं आणि कांहींस गोणत्यांत घालून कासे कि-

ळ्यावर बुडविलें.* या बंडापैकीं कासीम गोवळ कोटी हा आपल्या मुला माणसासह आलीबागेस पळून गेला. लक्ष्मण महादाजी याचा मुलगा तुकाजी लक्ष्मण हा या वेळीं पांच वर्षांचा होता. सबब त्यांचें रक्षण शिद्दी इब्राइमखान यानें आपले देखरेखी खालीं जंजिरे येथें केलें.

शिद्दी अंबर बक्षी हा वृद्ध झाल्या कारणानें त्याजकडे असलेलें बक्षीगिरीचें काम शिद्दी इब्राइम खानानें आपला थोरला मुलगा शिद्दी महमदखान यास इ. स. १८०६ मध्यें दिलें. शिवाय विहूर गांव त्यास इनाम दिला, आणि दुसरा मुलगा शिद्दी हशनखान यांस वालवटी गांव इनाम दिला. पुढें शिद्दी महमदखान ज्या वेळीं गादीवर बसला, त्या वेळीं संस्थानच्या वहिवाटीप्रमाणें विहूर गांव सरकारांत आला.

इ. स. १८१७ मध्यें मौंट स्टयूअर्ट एल्फिन्स्टन साहेब, पुणें सर केल्यानंतर महाडास आला, त्या

* ही जागा अशी आहे कीं, ती हिंदु तिथी १५-३० रोजीं मात्र स्पष्ट दिसते. इतर दिवशीं समुद्राचें पाणी त्यावर थोडे असतें यास गुप्त काशा अथवा खराबा असें म्हणतात. समुद्रांतून जाणारीं व येणारीं जहाजें यांस येथें फारच अपघात होत असे म्हणून हल्लीचे नवाबसाहेब यानीं त्याच्या समोर दिवा दांडी बांधली आहे तीस नानवेलीची बत्ती असें म्हणतात.

वेळीं शिद्दी इभ्राइमखानानें आपला थोरला मुलगा शिद्दी महंमदखान यांस मोठ्या इतमामानें त्याजकडे भेटण्यास पाठविलें.

सुमारें चवेचाळीस वर्षांपूर्वी दारूखान्याचा बुरूज बाहादुरशा यास आग लागल्यामुळें फुटला होता, त्याचें काम शिद्दी जव्हरच्या कारकीर्दीपासून चाललें होतें, परंतु तें काम अद्याप पुरें झालें नव्हतें, ह्मणून शिद्दी इभ्राइमखानानें सर्व धारेकऱ्यांपासून असलेल्या करापेक्षां दर बिघ्यास चार रुपये जास्त एक साल घेण्याचें ठरवून आलेला पैसा बुरजाच्या कामाकडे लाविला, आणि बुरजाचें काम पुरें केलें.

इ. स. १८२६ मध्यें शिद्दी इभ्राइमखान हा आजारी असतां एकाएकीं मरण पावला. हा फार देखणा असून दयाळु होता. परकीय लोकांचें चांगलें आगत स्वागत ठेवणारा होता. पहिली लग्नाची बायको आमनुबिबी हिच्या पोटीं शिद्दी महमदखान व शिद्दी हशनखान असे दोन मुलगे होते, पुरारवाली लग्नाची बायको हिच्या पोटीं शिद्दी अबदुलरहिमान आणि निक्याच्या बायकोच्या पोटीं शिद्दी अबदुलरहिम ( तलाववाले ) असे चार मुलगे होतें व चार मुली होत्या. शिद्दी इभ्राइमखानाच्या मरणानंतर त्याचा मुलगा गादीवर बसला. हा गादीवर

बसल्यामुळें त्याच्याकडे असलेली बक्षीगिरी शिद्दी अबदुलरहिमान ऊर्फ समदु बावा यास मिळाली.

---

## शिद्दी महमदखान

( इ. स. १८२६ पासून इ. स. १८४८ पर्यंत ).

हा सप्टेंबरच्या २२ व्या तारखेस गादीवर बसला. यानें मुंबईच्या गव्हरनराकडे साखर व शिरपाव पाठविला. याचवर्षी त्याचें लग्न शिद्दी माहामुद याकुतखान याची मुलगी मऱ्याम बिबी हिच्याशीं झालें. हें लग्न मोठ्या समारंभानें झालें.

इ. स. १८२७ मध्यें शिद्दी अबदुल रहिमान, महमदखानाचा धाकटा भाऊ यानें, महमदखानास कैद करून गादी बळकाविण्याचा गुप्त प्रयत्न चालविला, त्यांत शेख अल्ली जाहाबाज, अल्लीसाहेब पेशमाम, शिद्दी याकुत, शहाबंदर, शेख हरूण, दारूखान्याचा मुकादम हे पुढारी होते. ही बातमी गुलाम हुसेन अर्जबेगी यांस कळतांच त्यानें शिद्दी महमदखानास कळविली. तेव्हां त्यानें अल्लीसाहे· ब पेशमाम व हरूण मुकादम, यांस पकडून आणिलें. शेख अल्ली जाहाबाज, कासे किल्ल्यावर कारभारी होता तेथून त्यास धरून आणून त्याच्या पायांत जंजिरी बिडी घातली. शिद्दी याकुत व शहा-

बंदर बाग मांडल्यास पळून गेले, त्यास धरून आणण्याकरितां महमदखानानें फकीर महमद हवालदार याजबरोबर सोरटी व अरब लोक देऊन पाठविले. ते बाग मांडल्यास जाऊन शिद्दी याकुतखान यांस कैद करू लागले तेव्हां त्यानें तेथील फौजदाराचें सहाय्य घेऊन त्यांस घालवून दिलें आणि आपण मुंबईस गेला. नंतर धरलेल्या इसमांची चौकशी करून शिद्दी महमदखानानें शेख अल्ली पेशमाम यांस फटके दिले. जाहाबाज याचें बिबी हजानी समोर डोकें मारलें, आणि हरूण मुकादम यास मुलामाणसांसुद्धां हद्दपार केलें. या बंडापैकीं शिद्दी याकुतखान मात्र हातीं न लागल्यामुळें शिक्षा मिळाल्यावांचून राहिला होता, त्यास पकडण्याकरितां शिपाई देऊन त्यास मुंबईस पाठविलें. हें शिद्दी याकुत यांस कळतांच त्यानें गव्हरनराची भेट घेऊन जंजिऱ्याच्या लोकांनीं आपणास धरूं नये ह्मणून वीस शिपाई रक्षणाकरितां मागून घेतले.

नंतर महमदखानास मुंबई पहाण्याची इच्छा झाली ह्मणून आपल्याबरोबर १२ जहाजें व २०० लष्करी लोक घेऊन तो मुंबईस गेला. गव्हरनरसाहेब स्वतः त्यास उतरण्याकरितां मुंबई बंदरांत सामोरा आला होता. शहरांत गेल्यावर गव्हरनरसाहेबा-

नें शिद्दी महमदखानाचा चांगला आदरसत्कार केला. एक दिवस राहून स्वारी मांडले बोर्लई येथें आली, तेथें असतां त्यांची बायको मऱ्याम बिबी-साहेब ही प्रसूत होऊन तीस मुलगी झाल्याची बातमी त्यास समजली, तेव्हां शिद्दी महमदखान सर्व स्वारी-सह जंजिऱ्यांस आला.

नंतर शिद्दी इसूफ बाळूमियाचा मुलगा महमद-खानास भेटण्याकरितां जंजिऱ्यास आला; तेथें त्याचा चांगला आदरसत्कार करून महमदखानानें त्यास बरेंच इनाम दिलें, नंतर तो मुंबईस गेला. तेथें शिद्दी याकुतखान शहाबंदर यांस भेटला आणि जंजि-ऱ्यांवर स्वारी करण्यासंबंधी त्याच्याबरोबर सल्ला म-सलत करून दोघेही तळयास गेले. तेथें कांहीं लष्कर जमवून ते गोवेल्यास आले. हें शिद्दी महमदखानास समजल्यानंतर त्यानें शिद्दी हशन सुभेदाराबरोबर कांहीं लष्कर देऊन त्यास गोवेल्यास पाठविलें, आणि मद्गड किल्ल्याचा सुभेदार शिद्दी अबदुल्ला, जबर्ती यांस त्याची कुमक करण्याचा हुकूम पाठविला. हें सर्व लष्कर पाहून शिद्दी याकूतचे लोक भिऊन पळून गेले, नंतर शिद्दी याकुतखान हा दक्षिण हैद-राबादेस पळून गेला.

इ. स. १८२८ मध्यें शिद्दी महमदखानानें मदगड किल्ला मोडला ह्मणून शिद्दी अबदल्ला सुभेदार जंजिऱ्यास आला. शिद्दी महमदखानानें बोर्लेईच्या आगरांत वस्ती करण्याची तजवीज करून त्या टप्यास पंचतन टप्पा असें नांव दिलें.

शिद्दी महमदखानास मुलें होत, परंतु तीं जगत नसत, त्यामुळें तो दिलगीर असे. सय्यद हुशेन सय्यद अबदुलरहिमान ऐदूस याची फतिमा बिबी नांवाची एक मुलगी होती, तिचे आईबाप मरण पावले ह्मणून शिद्दी महमदखानानें तीस पालक बेटी समजून आपल्या येथें ठेविलें. तेव्हांपासून त्याची संतती जगूं लागली, हें या मुलीच्या पायगुणानें झालें असें समजून त्या मुलीवर त्याची फार कृपा असे. ती मोठी झाल्यानंतर त्यानें सय्यद अबदुलरहिम सय्यद हुशन नांवाच्या एका मुलाबरोबर तिचें लग्न लाविलें आणि खानदान ( सरकारचे भाऊबंद ) प्रमाणें सर्व शिरस्ते त्यास चालू केले; कांहीं शेतें व वाड्या त्यांच्या नांवानें इनाम करून दिल्या आणि जंजिऱ्यांत एक घर बांधून दिलें. हें सर्व अद्याप त्यांचा मुलगा सय्यद हुशेन ऐदुस यांच्याकडे चालत आहे.

शिद्दी अबदलरहिमान ( तलाव वाले ) महमद-

शिद्दी अबदुलरहिम जमदतखानीं यानें असें सांगितलें कीं, शिद्दी महमदखानास मारून तुह्मांस तक्तनिषीन करावें अशी माझी इच्छा आहे. हें अबदुलरहिमान यानें ऐकून घेतलें, परंतु त्यास जबाब दिला नाहीं, आणि ती हकीकत महमदखानास सांगितली. महमदखानानें या गोष्टी संबंधी आपली चांगली खात्री करून घेतल्यानंतर त्याच्याकडे विषाचा प्याला पाठविला, परंतु शिद्दी इस्मामलची आई खाशी बिबी ही शिद्दी महमदखानाची बहीण असल्यामुळें तिनें महमदखानाकडे जाऊन फार विनंती केली, आणि त्याची माफी मागितली. तेव्हां विषाचा प्याला परत बोलावून शिद्दी इस्मायल यानें घरांतून बाहेर पडूं नये, अशी त्यास शिक्षा दिली, आणि त्याचा सहाय्यकारी शमसुद्दीन यास किल्ल्यांतून बाहेर घालवून दिलें. शिद्दी अबदुलरहिम यानें ही गोष्ट महमदखानास कळविली, ह्मणून त्यानें त्यास कलगी व शिरपेच बक्षीस दिला.

इ. स. १८२८ मध्यें जुलई महिन्याच्या सातव्या तारखेस शिद्दी महमदखानास निक्याच्या बायकोपासून मुलगा झाला. त्याचें नांव शिद्दी इब्राहिम ठेविलें. याची शादी इ. स. १८३४ सांत शरीफा बिबी बरोबर मोठ्या समारंभानें व फार खर्चानें

झाली. शादीच्या वेळीं सर्व खानदानास व नौकर चाकर लोकांस शेले पागोटे व शिरपाव दिले. इतकें-च नाहीं, परंतु या शादीच्या वेळीं जंजिऱ्यांत इतके कलवांतीचे ताफे आले होते कीं, त्यांस जंजिऱ्यांत राहण्यास जागा नव्हती. महमदखानानें शिद्दी अ-बदुलरहिमानखान याजकडून बक्षीगिरीचा अधि-कार काढून आपला मुलगा शिद्दी इब्राइम यास दिला.

इ. स. १८३६ सालीं जाफराबादेस शिद्दी नस-रुल्लाखान सुभेदार होता, त्यानें शिद्दी महमदखा-नास कळविलें कीं, जुनागडच्या नबाबाचें लष्कर कव्याळी गांवास आलें आहे, तेथें लढाई होण्याचा संभव आहे, करितां कुमक, दारूगोळा व खर्चाक-रितां पैसा पाठवावा. त्यावरून महमदखानानें बहा-दूर हवालदाराबरोबर लष्कर व दारूगोळा देऊन जाफराबादेस पाठविलें. परंतु ही कुमक मिळण्यापू-र्वींच जाफराबादेच्या सुभेदारानें बाकरभाई सुभेदारा-स कव्याळीस पाठविलें होतें, तो तेथें तळ देऊन राहिला होता. जंजिऱ्याहून गेलेलें लष्कर त्यास मि-ळाल्यानंतर दुसऱ्यादिवशीं सकाळीं लढाईस सुरवात

झाली. हबशांस जय मिळाला, परंतु बाकरभाई सुभेदार मारला गेला. बहादुर हवालदार फार शौर्यानें लढला ह्मणून त्यास खान हा किताब मिळाला. या लढाईचें वर्तमान इंग्रजसरकारांस समजलें तेव्हां त्यांनीं जुनागडवाल्या नबाबास फार दोष दिला. हबशी सरकारचें फार नुकसान झालें, ह्मणून त्यास इंग्रजसरकारच्या मध्यस्तीनें वडली गांव बदला मिळाला. शिवाय जुनागडच्या नबाबानें ११० रियाळ, हबशी सरकारास खंडणी देण्याचें कबूल केलें ही खंडणी अद्याप त्याच्याकडून हबशी सरकारांस मिळत आहे.

अल्लु पारू या नांवाचा कोणी मनुष्य इंग्रजसरकारच्या मुलखांत चांचेपणा करून गलबतें लुटीत असे त्यास पकडण्याच्या कामांत इंग्रजसरकार असतां, तो जंजिऱ्यास पळून गेला, तेव्हां कांहीं साहेबलोक जंजिऱ्यास आगबोट घेऊन आले आणि शिद्दी महमदखानास आपला हेतू कळविला. अल्लू फकिराच्या वेषानें जंजिऱ्यांत राहत होता, त्यास जंजिऱ्यांतील लोकांनीं महमदखानाच्या हुकमावरून पकडून आणून साहेबांच्या स्वाधीन केलें, त्यांनीं त्यास कैद करून मुंबईस नेलें

हा वेळपर्यंत या मुलखांतील जमिनीच्या सान्या-चा किंवा सरकार देण्याचा वसूल निशाणी रुपयांत होत असे, परंतु या वेळीं प्रत्येक निशाणी रुपयास सरकार चार आणे बट्टा घेऊं लागलें, ह्मणजे पूर्वीच्या दराप्रमाणें जेथें एक निशाणी रुपाया सरकार देणें होतें, तेथें एक सुरती रुपाया द्यावा लागला, यामुळें सरकारची जमाबंदी बरीच वाढली.

इ. स. १८४८ मध्यें शिद्दी महमदखानाची प्रकृति फार अशक्त झाली. जगण्याची आशा राहिली नाहीं ह्मणून शिद्दी इभ्राइमखान यांस आपल्या मरणापूर्वी गादीवर बसविण्याची इच्छा होऊन त्यानें सर्व शिद्दी सरदाराच्या संमतीनें त्यास आगष्ट महिन्याच्या ३१ व्या तारखेस गादीवर बसविलें, पुढें सुमारें अडीच महिन्यांनीं तो मरण पावला. यास लग्नाच्या चार व निक्याच्या बारा, मिळून एकंदर १६ बायका होत्या. व शिद्दी इभ्राहीम, शिद्दी काशीम, शिद्दी माहामुद, शिद्दी अबदुलरहिम, शिद्दी इसूफ असे पांच मुलगे होते. यानें बाविस

१ कांहीं वर्षांमागें हबशी सरकारच्या निशानीचे रुपये चालत असत, त्याची किंमत बारा आणे भावानें व्यवहार असे, हल्लीं हा रुपाया मुळींच नाहीं परंतु पैसे आहेत, त्याची किंमत

र्षे व चार महिने राज्य केलें. हा फार हुशार होता. ाचा स्वभाव फार विलक्षण असे, परंतु तो राज्य-ारभारांत फार दक्ष होता. सदाशीव वामन श्रीव-ानकर यानें कांहीं महत्वाच्या राज्यकरस्थानांत ापली नेकी खऱ्या रीतीनें बजावल्यामुळें यांनीं याचा बहुमान केला होता, व याच वेळेपासून श्रीव-ेनकर यांच्या घराण्यांतील वंशज खानगीकडे मुख्य नेमिले होते.

---

## शिद्दी इब्राहमखान.

(इ. स. १८४८ पासून इ. स. १८७८ पर्यंत).

शिद्दी इब्राइमखान गादीवर बसला त्यावेळीं त्याचें वय २० वर्षांचें होतें. बक्षीगिरीचें काम शिद्दी इसूफ, शिद्दी महमद साहेब जादे यांस मिळालें होतें, व शिद्दी हुशनजबर्ती सुभेदार, उर्फ नाना-साहेब, अल्लीसाहेब अर्जबेगी आणि सखाराम सदाशिव मुत्सद्दी, हे तिघे सर्व राज्यकारभारांची कामें चालवित होते.

इ. स. १८६२ मध्यें जिल्हेज महिन्याच्या १० व्या तारखेस जिल्हेज ईदीच्या दरबाराला, सरकार जात असतां, त्यांस अपशकून झाला; तरी ते दरबा-रांत जाऊन तक्तावर बसले. इतक्यांत मिरझा, अब-

दुल्ला बेग, अबदुल रहिम जमादार, अबदुला कादीर जमादार, बाळा जमादार, व दुसरे कांहीं छोरवाव लोक यांनीं एकदम सरकारावर मिल्ला करून, दांदनी पट्टीचें मागणें केलें. ह्या भयंकर प्रसंगांत सरकारांस पाहून शिद्दी अबदला, शिद्दी हुशेन, सखाराम मुत्सद्दी, रावजी नरसिंह, शिद्दी अंबर, शाहाबंदर, शेख अल्ली अर्जबेगी व शिद्दी इस्मायल खिजमतगार, यांनीं सरकारच्या सभोंवतीं जमून त्यास अती त्वरेनें व युक्तीनें हवेलींत नेलें. नंतर सरकारांनीं आपलें मोकाशी लोकांचें लष्कर बोलावून बंडखोरांस पकडून सर्वांस शासन केलें.

इ. स. १८९१ च्या जुलई महिन्यांत 'नसर मकनून' नांवाचें एक जहाज मक्केहून कांहीं यात्रे-करू व माल घेऊन येत असतां, मोऱ्याच्या ठोक्या-जवळ खडकावर आपटून फुटलें. ही बातमी नबाब-साहेबांस कळतांच जहाजावरील लोकांस मदत कर-ण्याकरितां आपले लोक पाठविले, व त्यांस अन्न, वस्त्र व राहण्याकरितां ठिकाण देऊन त्यांची चांगली व्यवस्था ठेविली. ही मदत मिळाल्यामुळें जहाजावरील ११९ मनुष्यें सुरक्षितपणें किनाऱ्यावर आलीं. मदती-

१ सनदी नोकरांस अन्न मिळून त्यानंतर खर्चाकरितां पैसा मिळतो तो.

स आलेल्या लोकांनीं बहुतेक माल समुद्रांतून वर काढून त्या जहाजाचा कप्तान अबदुल अल्ली याच्या स्वाधीन केला, आणि तो जेव्हां जाऊं लागला तेव्हां दिलेल्या मालाची त्याच्याकडून पावती घेतली. जातेवेळीं त्यानें मालाची देखरेख करणारा महमदअल्ली याच्या स्वाधीन फुटलेलें जहाज करून त्यास तेथेंच ठेविलें त्यानें पुष्कळवेळां समुद्रांत पाणबुडे घालून बराच माल बाहेर काढिला, नंतर तो तेथून निघून गेला.

या प्रकारें सरकारांनीं मदत केली असतां व समुद्रांतील माल बाहेर काढिला असतां; त्यांनीं मागाहून माल काढून ठेविला असें महमद आयुब, शिद्दी अंबर सुर्ती, व हरूण मुकादम यांनीं जहाजाचा मालक अबदुल अल्ली हैदराबादचा रहाणारा होता त्यास सांगून, मुंबईसरकारांत फिर्याद देण्याची त्यास भर दिली व पुरावा करण्याचें कबूल केलें, आणि मिळणाऱ्या रकमेचा अर्धा हिस्सा देण्याचा त्याच्याकडून करार लिहून घेतला. यावरून मालकानें मुंबईसरकारांत ५४,००० चोपन हजार रुपयांची फिर्याद दिली, तेव्हां सरकारच्या हुकमानें ठाण्याचा कलेक्टर कार साहेब चौकशी करण्याकरितां जंजिऱ्यास आला.

महमद अयुब वगैरे कांहीं लोकांनीं कार साहेबास लालूच देण्याविषयीं सल्लामसलत करून कार साहेबास विचारलें. त्यावरून नबाब सरकारनें कांहीं माल ठेवल्याचा त्यांस संशय येऊन त्यानें अधिक चौकशी न करितां ९४,००० रुपयांचें मागणें केलें. आणि त्यास सांगितलें कीं, तुह्मांस कांहीं यासंबंधी तक्रार करणें असल्यास ती तुह्मी मुंबईसरकाराकडे तीन वर्षांचे आंत करावी. तोंपर्यंत ही तुमची रक्कम अनामत ठेविली जाईल. त्यावरून सरकारानें ही रक्कम चार दिवसांच्या आंत देण्याचें कबूल केलें; व ती रक्कम संस्थानास भरावी लागली. चौकशीअंतीं असें ठरलें कीं, संस्थानच्या नोकरांनीं या मालांची अफरातफर केली आहे. त्याप्रमाणें त्या कामीं कित्येक लोकांस शासन भोगावें लागलें.

जहाजाचा माल काढून देण्याच्या कामांत शिद्दी हुशन सुभेदार, शेख अल्ली अजबेगी व सखाराम मुत्सद्दी, हे असल्याकारणानें माहामुद्खान, चहाबंदर वगैरे छोरवाद्यांच्या फसादींतील लोकांनीं मागील सूड उगविण्याकरितां ही रक्कम वरील तीन इसमांपासून घेण्याचें नबाब सरकारच्या मनांत भरून दिलें. तेव्हां सरकारनें त्यांच्यावर फार निष्टूरतेचा हुकूम चालवून त्यांची सर्व मालमत्ता घेऊन घरवाडी सरका-

रांत घेतली. तत्राप रकमेची भरपाई झाली नाहीं म्हणून पुन्हा त्यांच्यावर सक्तीचा हुकूम सोडला, तेव्हां आपल्यावर फार भयंकर प्रसंग येईल या भीतीनें सखाराम सदाशीव मुत्सद्दी हा चण्हेर येथें पळून गेला.

जहाजावरील १२९ मनुष्यें सुरक्षितपणें इंग्रजी अमलांत गेलीं आणि मुंबईसरकारास आपली सर्व हकीकत कळवून त्याबद्दल यथायोग्य इनसाफ मागितला. सरकारनें ठाण्याचे कलेक्टर जान साहेब यास त्या कामाची चौकशी करण्यास सांगितलें. नबाब सरकारतर्फे पुरावा करण्याकरितां महमद अयुब व बाळा पलवारे हे ठाण्यास गेले. सखाराम सदाशीव यानें आपली हकीकत प्रथमच कलेक्टर साहेबांस कळविली होती; व तो तेथेंच होता. चौकशी अंतीं सखाराम सदाशीव हा निर्दोषी ठरला. हें काम चालत असतां सखाराम सदाशीव यास स्वाधीन करण्याविषयीं नबाब सरकाराकडून लिहून गेलें होतें. परंतु अपराधाची शाबिती झाली नसल्याकारणानें त्यांस स्वाधीन करण्यांत येत नाहीं असें लिहून आलें. पुढें अडीच महिन्यांनीं खानसाहेबास ठाणें कलेक्टराकडून असें लिहून आलें कीं, आपणाकडून ५४००० हजार रुपये घेतले आहेत, ते यथायोग्य आहेत.

परंतु तो पैसा काढण्याकरितां आपल्या कारभारी लोकांस जो त्रास होत आहे, त्याचा मात्र मुंबई सरकारास फार खेद वाटत आहे.

सखाराम सदाशिव हा चण्हेऱ्यास पळून गेल्यानंतर त्याचीं माणसें खानसाहेबांनीं जंजिऱ्यांत नेऊन ठेविलीं होतीं, त्यांस फार त्रास होत असेल असें त्यानें ठाण्याच्या कलेक्टरांस कळविल्यावरून, त्यांस पाहण्याकरितां हॅन्सन साहेब व आत्माराम हरी असे दोन पोलीस अमलदार जंजिऱ्यास आले. नंतर दोन महिन्यांनीं त्याच्या मुलामाणसांची सुटका झाली, व त्यांची जी मालमत्ता सरकारांत घेतली होती, ती त्यांस परत मिळाली.

इ. स. १८९९ सालीं एका शिपायानें चोरीचा गुन्हा केल्यामुळें त्यास खानसाहेबांनीं महमदी शास्त्रास[१] अनुसरून हात तोडण्याची शिक्षा दिली.

---

१ त्याचप्रमाणें कित्येक लोक या शास्त्रास अनुसरून असें कळवितात कीं, हें राज्य सत्ययुगीं असे लोक मानीत व नितीनें वागत. अनीतीनें वागलें असतां, कडक शिक्षा भोगावी लागे, त्याचे दाखले बहुतेकांनीं पाहिले आहेत. असें ह्मणतात कीं, कोणी कोणाचा अपराध केला आणि त्याची फिर्याद सरकारांत आली ह्मणजे दोन्ही पक्षकारांचें बोलणें करारावर लिहून घेत व अपराधी कबूल न झाल्यास त्यास मजावराकडे पाठवून देत.

त्याचा हात तोडल्यानंतर त्यानें मुंबई सरकारास आपली हकिकत कळविली, तेव्हां मुंबई सरकारनें नवेंबर महिन्याच्या पहिल्या तारखेस खान साहेबांस लिहिलें कीं, ज्या गोष्टी तुमच्या प्रजेच्या हिताकरितां आहेत अशा गोष्टीच्या संबंधानें तुमच्या मुलखाच्या राज्यकारभारांत इंग्रज सरकारनें आजपर्यंत आपला हात घातला नाहीं, परंतु याप्रमाणें निष्ठूर आणि केवळ रानटी शिक्षा देण्याची तुमची चाल आम्ही अगदीं नापसंत करितों. अशी निष्ठूर शिक्षा पुन्हां देण्यांत आली तर मात्र इंग्रज सरकारचा तुमच्यावर रोष होईल.

इ. स. १८९९ सालीं अंजनअल्ली मुंबईवाला याच्या मिरा बिबी नांवाच्या मुलीशीं नबाब साहेबाची दुसरी शादी झाली. पुढें तीन वर्षांनीं मिरा बिबी मरण पावली. ही बाई फार शांत स्वभावाची होती.

यावेळीं राज्यकारभारांत हुशार लोक नसल्यामुळें सरकाराचें फार नुकसान झालें. तेव्हां रावजी

---

तेथें त्यास, मुजावर स्नान वगैरे घालून पिराची बेडी घाली, व पिराच्या सभोंवती प्रदक्षणा करण्यास लावी. खरा अपराधी असल्यास ती बेडी वरती चढे, नाहींपेक्षां तुटे. या पिराचें नांव हजरतशा वाली असें आहे.

नरसिंह व शिद्दी अंबर, शाहाबंदर यांनीं कारभाराचें काम चालविलें. पुढें इ. स. १८९८ मध्यें सखाराम सदाशीव यांस खानसाहेबांनीं चण्हेराहून आणून त्यास पूर्ववत कारभाराचें काम चालविण्यास सांगितलें. शिद्दी हिलालच्या वारसानें जाफराबादेवर आपला हक्क सांगून ती मिळण्याविषयीं इंग्रज सरकार मार्फत काम चालविलें. या कामाकरितां काठेवाडचा पोलिटिकल एजंट जाफराबादेस येऊन राहिला होता, त्यानें जाफराबादेवर हबशी सरकारचा हक्क कसा आहे, हें विचारल्यावरून सखाराम सदाशीव यानें मुंबईहून येतेवेळीं आपल्या बरोबर इ. स. १७६१ सालीं झालेला जाफराबादचा तहनामा आणिला होता, तो पोलिटीकल एजंटाकडे पाठविला. त्यावरून शिद्दी हिलालचा किंवा त्याच्या हक्क वारसाचा जाफराबादेवर कोणत्याही प्रकारें हक्क नाहीं, असा निर्णय झाला. या कामांत सखाराम सदाशीव याचा फार उपयोग झाला ह्मणून नबाब सरकारानें त्यास शिरपाव दिला.

इंग्रज सरकारची एक आगबोट हपसाणच्या किनाऱ्यावर पाणी मापण्याकरितां आली होती. ती जेव्हां कासे किल्ल्याजवळ गेली, तेव्हां किल्ल्यांतील रखवालदारांनीं तिच्यावर दगडांचा

मडीमार करून तीस जवळ येण्याचा अटकाव केला. जंजिरा संस्थानचे सर्व कैदी काश्यावर असल्यामुळें सारकारच्या परवानगी वांचून तेथें जाण्याची सक्त मनाई होती. कोणास जर जाणें झालें तर प्रथम काश्यावरील किल्लेदारास नबाब सरकारांकडून हुकूम जात असे. या आगबोटीची सूचना नबाब सरकारास मिळाली नसल्याकारणानें काशावरील किल्लेदारास कोणताच हुकूम गेला नव्हता म्हणून त्यानीं आगबोटीस किल्ल्याजवळ येण्याचा अटकाव केला. काशावरील लोकांच्या या कृत्यामुळें हबशी सरकारास मुंबई सरकारानें ठपका दिला.

. इ. स. १८५९ मध्यें खानसाहेबाचा थोरला मुलगा शिद्दी महंमद बक्षी व मुलगी हशीना बिबी यांचीं लग्नें करण्याचा विचार झाला.

इ. स. १८५५ मध्यें मि. कार साहेब जाहाजांच्या प्रकरणांत चौकशी करण्याकरितां आला होता. तेव्हां त्यानें सुमारें सहा महिने येथें मुक्काम ठेऊन थोडक्यांत आणि बारीक चौकशीनें तपास करून सर्व संस्थानच्या मागील माहितींचे ऐतिहासिक टिपण हकीकत रूपानें इंग्रज सरकारांस कळविली आहे. व ती सिलेक्शन्स फ्राम दि रेकार्डस ऑफ धी बाँबे

प्रेसीडेन्सी व्हालूम पहिला; यांत दाखल आहे. त्यांतील थोडकी व मुख्य हकीकत येथें घेतली आहे ती.–

१ येथील नबाबास, 'नबाब' हा किताब शाहा आलमगीर बादशाहा यानें दिला आहे.

२ हल्लीचे खानसाहेब यांचें वय सुमारें ३० वर्षांचें आहे. यांची बायको शरीफा बिबी हिचें वय सुमारें वीस वर्षांचें असून तिच्या पोटीं अजून कांहीं संतान नाहीं, परंतु त्याची राख? सैदाबाई हिच्या पोटीं दोन मुलगे झाले, व वडील मुलगा मृत्यु पावला. दुसरा मुलगा अडीच वर्षांचा आहे. त्याचें नांव शिद्दी महंमद आहे. असें सांगतात कीं, हीं मुलें जन्मण्याच्या पूर्वीं नीका लाविला होता. परंतु हे खरें आहे कीं, त्यांचा प्रसिद्ध समारंभ झाला नाहीं. खानसाहेब मरण पावल्यानंतर त्यांच्या गादीचा खरा वारस शिद्दी महंमदखान समजला जाईल किंवा काय? ह्या प्रश्नाचा निकाल पुढें करण्याचा वेळ येईल.

३ खानसाहेबांस नारंगीबाई ही निक्याच्या बायकोपासून एक मुलगी झालेली आहे शिवाय त्यांस आणिखी दोन निक्याचा बायका आहेत.

४ यावेळीं शिद्दी हुसेन सुभेदार व कांहीं कोंकणी मुसलमान व परभु आणि एक दोन शिद्दी हे

सर्व राज्यकारभाराचें काम चालवितात. नबाब साहे-बांच्या असमर्थपणामुळें, ह्या लोकांच्या हातांत सर्व राज्यसत्ता राहिली आहे.

५ जंजिऱ्या किल्ल्यांत शंभर शिद्दी आहेत. दुसरे दोनशे शिपाई आहेत. आरब एकही नाहीं. हें राज्य स्थापन करणारा शिद्दी अंबरसानक याच्या बरोबर जे लोक आले, त्याच्या वंशापैकीं बहुतेक लष्करी लोक आहेत. किल्ला हा एक बेट असून मोठा आहे, व तो चांगला दुरुस्त आहे. यांत उपयोगी येण्या-सारख्या तोफा आहेत.

६ कोंकणांत हबशांच्या राज्यांत १७५ गांव आहेत. त्यापैकीं २३ इनाम आहेत.

७ एकंदर संस्थानाचें उत्पन्न १,७०,००० हजा-रांचें आहे, हें सर्व उत्पन्न ऐनजिनसी आहे.

८ एका मागून एक आजपर्यंत गादीवर बसलेले सर्व नबाब लोकप्रिय असून त्यांची कारकीर्द शांत व सौम्य होती, ही गोष्ट हापसाणचा इतिहासांत लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

९ जंजिऱ्याचा नबाब खंडणी देत नाहीं आणि ब्रिटीश सरकारांपासून अगदीं स्वतंत्र आहे. आणि स्वतंत्र राहण्याचा त्याच्यांत सामर्थ्य आहे. तेथप-र्यंत स्वतंत्र रहाण्याचा त्याचा निश्चय आहे.

१० येथील नबाब जंजिरे किल्ल्यांत राहतात.

११ या लहानशा दरबारांतील मुख्य पुरुष शिद्दी हुसेन सुभेदार, व शेखानी सुभेदार हे आहेत. जेव्हां ३८० वर्षांपूर्वी या जाहागिरीची स्थापना झाली, तेव्हां प्रथमच्या शिद्दीबरोबर जे लोक आले, त्यांचे वंशज हे लोक आहेत. दुसरी दोन प्रसिद्ध घराणीं आहेत. एक सबनीसांचें व दुसरें दिवाणाचें. या घराण्याच्या हातांत पूर्वी संस्थानाचा कारभार होता. सध्यां कारभार ज्याचें जसें चालेल तसें तो करितो! या दोन प्रसिद्ध परभु घराण्याची हकीकत इंकडील दफतरांवरून अशी आहे कीं, हीं दोन्ही घराणीं सरकार कागदपत्रीं जंजिरकर व हपशीभाईबंद या किल्ल्यांतील लोकांत अनुक्रमे मोडतात. त्यांस पोहोंचणारीं वेतनें जंजिऱ्यांतील लोकांप्रमाणें लष्करी खात्यांत खर्च पडतात व शादी खुशीचे सर्व शीरस्ते किल्ल्यांतील लोकांप्रमाणें यांस चालू आहेत. जंजिरे किल्ल्याच्या आरंभापासून त्यांचीं घरें सरकारच्या मुख्य हवेलीच्या अगदीं नजीक असून त्यांचें राहणें तेथेंच होतें. इ. स. १८६१ सालीं किल्ल्यास आग लागल्यापासून हे मुरूडांत राहतात.

१२ या संस्थानाचें क्षेत्रफळ ३२४ चौरस मैल जमीन आहे.

१३ येथील जमीन वालवंटाची असून प्रदेशांचा देखावा डोंगराळ आहे. डोंगरांचा उंची अदमासें दहा हजार फूट असावी.

१४ येथील उत्पन्न शेतकीचें आहे. पीकणारीं धान्यें बहुतकरून नाचणी, वरी, आणि भाताचें आहे.

१५ लोकसंख्या ७१,००० एकाहत्तर हजारांची आहे, त्यांत मुख्य जाती मुसलमान, मांडारी, कोळी, आणि आग्री, ह्या आहेत. थोडे परभु, ब्राह्मण, वगैरेही आहेत.

१६ दिवाणी फौजदारी न्याय बराच चालतो असें नाहीं.खाडच्या अधिकाऱ्याच्या तबेतीवर बरेंच आवलंबून आहे. कामाची चौकशी तोंडीं होते. अधिकाराची ठरावीक यत्ता नाहीं. वसूल ऐन जिन्सी असल्यामुळें लोक जरी गरीब आहेत; तरी त्यांस कर्ज काढावें लागत नाहीं.

---

१ सदरहु ज्ञातींतलि लोक प्रथम अरमारावर असत. तेणेकरून यांची स्थिति चांगली होती; परंतु सध्यां पाहिलें तर हे लोक संस्थानांत मोलमजुरी करण्याचे उपयोगांत आहेत. सरकारी खात्यामध्यें नोकर सुने आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. कारण वगवशीला नाहीं.

२ या ज्ञातीचे बलाढय फारच आहे, ज्या खात्यांत पहावें त्या खात्यांत शेकडा ९९ हेच आहेत.

१७ बहुतेक शिक्षा दंडाची असते. निरपराधी मनुष्य नेहमी निर्भय राहील हा निराळा प्रश्न आहे; मोठ्या गुन्ह्यास कैदेची शिक्षा देतात.

१८ विद्येच्या कामीं संस्थानांतून मदत नाहीं. देवी काढण्याची हबशी सरकारनें हरकत ठेविली आहे.

१९ ताप, नारू, हीं येथें मुख्य दुखणीं आहेत.

सदरहु हकिकत पुऱ्या चौकशीनें त्यानें लिहून मुंबईसरकारांस कळविली होती. ही खबर मुत्सद्दी, सरदार, भाईबंद, वगैरे यांस माहीत होती, ह्मणून सखाराम सदाशीव यानें सल्ला मसलत करून सरकारची तिसरी शादी करण्याचा विचार करून त्या कामांत सरकारचा सल्ला घेतला. नंतर शिद्दी हुशन सुभेदार उर्फ नानासाहेब यांची कन्या फातिमा बिबी साहेब हिशीं लग्न करण्याचें कबूल केल्यावरून ही तिन्हीं लग्नें तारीख २२ मे इ. स. १८९९ सालीं मोठ्या समारंभानें झालीं. नोकर चाकर लोकांस मान मरातबे शाली पागोटीं इनाम मिळाले. एकंदर खर्च दोन लक्ष रुपये झाला.

परशराम कृष्ण महाजन या नांवाचा केळशीचा एक ब्राह्मण होता, त्यास खान साहेबांनीं आपल्या गांवाचा वसूल करण्याकरितां कारकून ठेविलें होतें, त्यांनीं दहा वर्षें काम केल्यानंतर तो बेमान होऊन

सरकारच्या वसूलाचा पैसा घेऊन ब्रिटिश हद्दींत पळून गेला. नबाब सरकारानें त्यास धरून आणून सहा महिनेपर्यंत अटकेंत ठेविलें. ही गोष्ट मुंबईसरकारांस कळतांच, त्यांनीं इ. स. १८६२ च्या आक्टोबर महिन्यांत एका लष्करी आगबोटींत ठाण्याचा कलेक्टर राबर्टसन साहेब यांस जंजिऱ्यांत पाठवून महाजन यास त्याच्या ताब्यांत देण्याविषयीं लिहून कळविलें. नंतर दीड वर्षानें मुंबईसरकारानें तीन हजार रुपये नुकसानीबद्दल घेऊन ते महाजन यास देवविले.

पुढें इ. स. १८६३च्या नवंबर महिन्यांत राबर्टसन साहेब यानें नबाबसरकारास लिहून कळविलें कीं, तुमच्या हद्दींत गलबतावरील माल चोरीस जातो; व इंग्रज सरकारच्या रयतेस अटकाव होतो, व युरोपियन लोकांसही आपल्या हद्दींत घेण्याचा प्रतिबंद झाला आहे. ह्या गोष्टीमुळें मुंबईसरकारानें हिंदुस्थानसरकारांस लिहून कळविल्यावरून त्यांनीं असा ठराव केला आहे कीं, ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या लिहिण्याकडे लक्ष पोंचण्याकरितां तुह्मी आपल्या खर्चानें ठाण्याच्या कलेक्टराजवळ एक वकील ठेवावा, त्याप्रमाणें हबशी सरकारनें हाजी महमद ठाणगे यांस आपल्या तर्फे ठाण्यास वकील नेमिलें.

इ. स. १८६२ सालीं आगष्ट महिन्याच्या ३१ व्या तारखेस खानसाहेबांस फतिमाबिबी साहेबांच्या पोटीं मुलगा झाला. गादीचा पुढील मालक जन्मास आल्यामुळें सर्वांस मोठा आनंद झाला. तोफांची सरबत्ती झाली, नगारा, चौघडा वगैरे वाद्यांचा गजर झाला. साखरा वाटल्या. मोठ्या थाटानें आनंद छट्टीचा समारंभ होऊन सर्वांस पोषाख मिळाला. मुलाचें नांव शिद्दी अहमदखान ठेविलें, जन्मदिवसापासून खानसाहेब शिद्दी हुशन जबर्ती सुमेदार उर्फ नानासाहेब याजकडे राहत होते; व तेथून सर्व राज्यकारभाराची व्यवस्था चालत असे, ह्या महोत्सवास सरकारनें शिद्दी हुशन सुमेदार यांस ४५ खंडीची सनद करून दिली. सर्व मुत्सद्दी एक मतानें राहून राज्यकारभारांचीं कामें कांहीं दिवस सुरळीतपणें चाललीं.

हा मुलगा झाल्याकारणानें, सैंदाबाईचा मुलगा शिद्दी महमदखान यास गादी मिळण्याची सैंदाबाइची आशा अगदीं नाहींशी झाली. सबब हाजीमहमद ठाणगे यानें शिद्दी अहमदखानास इब्राहीमखानाचा औरसपुत्र ठरविण्याकरितां इ. स. १८४९ सालीं मे महिन्याच्या १२ व्या तारखेस इब्राहीमखानाशीं निका झाल्याचें खोटें पत्रक तयार केलें,

आणि सैंदाबाई हें नांव बदलून जैना बिबी हें नांव प्रसिद्ध केलें खरें, परंतु मागील पत्रांतील पूर्वीचें नांव बदलून हें नांव घातल्याचे कागदपत्र आढळतात, व कांहीं ठिकाणीं पूर्वीचेंच नांव आहे.

सैंदाबाईनें फातिमाबिबीविषयीं असा निश्चय केला कीं, 'अर्थात सवतीमत्सर आहे' त्याप्रमाणें अनेक कुभांडें रचून सरकारास दाखविलीं. कारण सरकाराचा स्वभाव अगदीं भोळा होता. त्यामध्यें सैंदाबाईवर फार प्रीति होती, तेणेंकरून तीं कुभांडें त्यास खरीं भासूं लागलीं; व फातिमाबिबीवर इतराजी होऊं लागली. तेणेंकरून फातिमाबिबी आपल्या बापाच्या घरीं जाऊन राहिली. हीं सर्व कृत्यें सैंदाबाई महमद आयुब याचे साह्यानें करीत असे.

फातिमाबिबीसाहेब बापाच्या घरीं गेल्यावर सखाराम सदाशीव मुत्सद्दी हा त्यांस मिळण्याकरितां जात असे, हें सरकारांस कळल्यावरून त्याजवर सक्तीचा हुकूम करण्यांत आला, सबब सखाराम सदाशीव यानें बिबी साहेबांस फार कष्टी पाहून त्यास धीर दिला कीं, मी मुंबई सरकाराकडे जाऊन तुह्मांस या संकटांतून मुक्त करितों, असें सांगून तो आपल्या घरीं येऊन रातोरात मुलामाणसासुद्धां कण्हेर बिरवाडीस गेला. दुसऱ्या दिवशीं ही बातमी

सरकारास कळतांच त्यांनीं सखाराम सदाशीव याची सर्व मालमत्ता विकून फस्त केली, व शिद्दी हुशन सुभेदार, शेख हशन जमादार, महंमद साल्या ढोखंडे (बिबी साहेबांचा कारभारी) या तिघांस कासें किल्यांत कैदेंत ठेविलें, आणि फातिमा बिबीच्या व शिद्दी अहमदखान याच्या आंगावरील सर्व दागदागिने काढून घेतले, आणि शिद्दी हुशन सुभेदाराच्या घरीं त्यांस कायमचें ठेविलें. सखाराम सदाशीव यानें मुंबईस जाऊन झालेली सर्व हकिकत मुंबई सरकारास कळविली. त्यावरून तपासाकरितां हॅवलॉक ठाण्याचे कलेक्टर साहेब यांनीं दादाजी बापूजी महालकरी, यांस जंजिऱ्यास पाठविलें, त्यानें सर्व हकिकतीचा रिपोर्ट ठाणें कलेक्टर साहेबांकडे केला.

खान साहेबांस औरस पुत्र झाल्या वेळापासून सैंदाबाईच्या मनांत फातिमा बिबीविषयीं वैषम्य येऊं लागलें होतें. शिद्दी अहमदखान याच्या जन्मास पुरे सहा महिने झाले नाहींत तोंच, ती फातिमा बिबीचा द्वेष करूं लागली होती. इ. स. १८६३ सालीं खानसाहेबांच्या पायास नारू झाल्यामुळें ते आजारी होते. सैंदाबाई त्यांचे जवळ सदोदित असे. एके दिवशीं तिनें आजारीपणाचा

खोटा बहाणा करून सरकारांस सांगितलें कीं, फातिमाबिबी माझें दुखणें वाढण्याकरितां मलभलते उपाय करीत असते; आणि त्यामुळें मला फार हैराण व्हावें लागतें. ही गोष्ट सरकारांस खरी वाटली. कारण सरकारचा स्वभाव अगदीं भोळा होता. त्यांस कोणी कांहीं सांगितलें तरी खरें वाटत असे. दुसऱ्याचें कपट त्यांस कळत नसे. तशांत सैंदाबाईवर त्यांची फार प्रीति होती. ती मोठी चतुर व कावेबाज असल्यानें तिनें सरकारांस अगदीं आपलेंसें करून घेतलें होतें; व फातिमाबिबी लग्नाची बायको फार चतुर व सौम्य स्वभावाची असतांही तिच्यावर सरकारची गैर मर्जी झाली; सैंदाबाईनें वैषम्यरूपी पेरलेलें बीं उद्भवूं लागलें. तिचा अंमल फातिमा बिबीवर होऊं लागला. तिनें करवेल तितका फातिमा बिबीचा छळ केला. तिच्यावर नानाप्रकारचे खरे खोटे आरोप घातले, आणि तिच्या प्राणावर संकट येईल असें करविण्यासही सोडलें नाहीं. दागदागिन्याविरहीत तिला दूर केलें, त्यामुळें ती फार त्रासून गेली, आणि एकांतवासाचें सुख बरें वाटून त्याचा अनुभव ती आपल्या बापाच्या येथें घेऊं लागली.

सैंदाबाईस महमद आयुब याचे सहाय्य होतें त्याच्या मसलतीनें तीं सर्व कृत्यें करीत असे. तोही मनाचा निष्ठूर असे. फातिमाबिबीची काडीइतकी सुद्धां त्यास दया आली नाहीं. या त्याच्या कृत्याबद्दल त्यास पुढें चांगलें शासन मिळालें. विनाकारण फातिमाबिबीचा छळ केला हें ईश्वरास सहन न होऊन जणू काय त्यास या अपराधाबद्दल शासन करण्याकरितांच त्याच्याविषयीं सरकारच्या मनांत वाईट वागूं लागलें. फातिमाबिबी सरकारची लग्नाची बायको असतां सैंदाबाईसारखी यःकश्चित राख! कीं जिचा प्रसिद्धपणें निक्याचाही समारंभ झाला नव्हता, व जिचा सरकारशीं कोणत्याही प्रकारचा संबंध होण्यापूर्वी सरकारनें तीस वाईट वर्तणुकीविषयीं दोषी ठरवून दुसऱ्या हुकमाच्या अवधीपर्यंत दळण्याची शिक्षा दिली होती; तिनें फातिमा बिबीसारख्या सुशील व चांगल्या कुळांत जन्म घेतलेल्या सरकारच्या लग्नाच्या बायकोवर आपली सत्ता चालवून व नबाबास आपल्या कपटजालांत गुंतवून, तिला फार हाल सोसण्यास भाग पाडावें, ही किती दुःखाची गोष्ट!!

महंमद आयुब हा एकेदिवशीं सरकारच्या व सैंदाबाईच्या मनास वाईट लागण्यासारखे शब्द

बोलल्यामुळें त्याच्यावर सरकारची फार इतराजी होऊन त्यांनी त्याच्यावर **सकीना** नांवाच्या बाईचा खून केल्याचा आरोप ठेवून कैद केलें; आणि त्याच्या पायांत जंजिरी बिडी घातली. नंतर त्याची सर्व मालमत्ता जप्त केली. तो कैदेंत असतांच मरण पावला. त्याच्या मरणाची हकिकत त्याची बायको **मऱ्यामबिबी** हिनें मुंबई सरकारांस कळविली. तेव्हां **हॅवलाक** साहेब इ. स. १८६१ मध्यें जंजिऱ्यास आला. चौकशीअंतीं साहेबास असें दिसून आलें कीं, **महमद आयुब** याच्या विरुद्ध फार कोता पुरावा असता, त्यास कैद केलें; आणि १५ पौंड वजनाची बिडी त्याच्या पायांत अशा रीतीनें घातली होती कीं, त्याच्या शरीराची दूण होऊन तो मरण पावला. अशा पुराव्यावरून साहेबानें जंजिऱ्यांतील सर्व कैदखाने तपासून त्यात सांपडलेल्या बिड्या आपल्याबरोबर नेल्या आणि जुलमानें बाटविलेल्या अबलांची जंजिऱ्यांतून सुटका केली; आणि **महमद आयुब** यांची जी मालमत्ता जप्त करून सरकारनें नेली होती, ती त्याच्या बायकोस परत देवविली.

---

१ सदरहु बिडी १६ पौंडांची असून ती पेहरविण्याची चाल इतकी विचित्र होती कीं, ज्यास या बिडीची शिक्षा होई तो स्वर्गाचा धनी लवकरच होत असे अशी तिची स्थिति असे.

इ. स. १८६६ सालीं नबाब साहेबांची स्वारी जाफराबादेस गेली. तेथें असतां अंजिऱ्यांत आग लागल्याचें वर्तमान त्यांस समजलें, तेव्हां ते अंजिऱ्यास आले, आणि ज्यांचीं घरें जळालीं होतीं त्यांस घरें बांधण्याकरितां लांकडें दिलीं. आग लागली त्यावेळीं शिद्दी हुशन सुभेदाराचेंही घर जळालें ह्मणून फातिमा बिबी आणि शिद्दी अहमदखान (छोटाबाबा) यांस महमद चंद्रुस, यानें राजपुरीस नेऊन ठेविलें; ह्मणून त्याचें तुरबाड येथें असलेलें घरदार व मालमत्ता हीं इभ्राहीम जमादारास पाठवून जप्त केलीं.

शिद्दी हुशन सुभेदार, शेख हशन जमादार, व महमद साल्या लोखंडे, या तीन इसमांस नबाब साहेबांनीं कासे किल्ल्यावर कैदेंत ठेविलें होतें. ते इसवी सन १८६६ च्या मे महिन्यांत मोहरमच्या रात्रीं सर्व लोक खेळण्याच्या नादांत असतां पळून गेले. यांस शिद्दी हशन किल्लेदार, मिरझा सरनोबत, आणि दाजीराव सुभेदार, या तीन इसमांचें सहाय्य होतें असें सरकारांस वाटून त्या प्रत्येकांस चिरलेल्या बांबूनें बरेच फटके दिले. त्यामुळें त्यांच्या अंगांतून रक्तश्राव सुरू झाला. त्यापैकीं शिद्दी हशन किल्लेदार घेरी येऊन जमिनीवर

पंडला व मिरझा सरनोबत, आणि दाजीराव सुभेदार, हे थोड्या वेळानें मरण पावले. पळालेल्या कैद्यांस धरून आणण्याकरितां खान साहेबांनीं कांहीं मनुष्यें पाठविलीं, परंतु ते हातीं लागले नाहींत. त्यांस स्वाधीन करण्याविषयीं खान साहेबांनीं इंग्रजसरकारास लिहिलें, परंतु त्याकडे त्यांनीं लक्ष्य दिलें नाहीं.

शिद्दी हुशन सुभेदार कासे किल्ल्यावरून पळून गेल्यानंतर पांचवे दिवशीं फातिमा बिबी साहेब एकाएकीं मरण पावली !! तिच्या मरणाचें खरें कारण आजपर्यंत कोणाच्याही समजण्यांत आलें नाहीं. ही फार शांत स्वभावाची व सहनशील बाई होती. हिच्या कबरीचें मकान राजपुरीस आहे. त्यास अमा साहेबाचें मकान असें ह्मणतात.

पसार झालेले कैदी व सखाराम सदाशीव मुत्सद्दी यांनीं नबाब सरकारच्या जुलमाची सर्व हकीकत ठाण्याच्या कलेक्टर साहेबाकडे कळविली, तेव्हां त्यानें हबशी सरकारच्या वकीलामार्फत मरहुम फा-

१ सदई किल्ल्यापासून जामिनीचा किनारा सुमारें तीन चार मैल आहे. अशा समुद्र दुर्ग किल्ल्यांतून शिद्दी हुशन सुभेदार पळून गेला होता. हा मोठा शूर पुरुष असे. इ. स. १९०० रोजीं हा मृत्यु पावला. याचें प्रेत अमा साहेबाचे मुकामा मध्येंच दफनाविलें.

तिमा बिबी साहेब, शिद्दी इशन किल्लेदार, मिरझा सरनोबत, आणि दाजीराव सुभेदार, यांच्या मरणांचीं कारणें विचारलीं; तेव्हां खानसाहेबांकडून असें लिहून गेलें कीं, फातिमा बिबी आज सुमारें एक वर्षपर्यंत आपल्या बापाच्या घरीं राहत होती, तथें ती मरण पावली. शिद्दी इशन किल्लेदार जिवंत आहे. मिरझा सरनोबत आणि दाजीराव सुभेदार हे पटकीच्या उपद्रवामुळें मरण पावले. परंतु मुंबईसरकारास हीं कारणें बरोबर वाटलीं नाहीं. ह्मणून त्यांनीं हवलाक साहेबांस जंजिऱ्यास जाण्यास सांगितलें. तो आपल्या बरोबर एक हत्यारबंद शिपायांची पार्टी घेऊन सरकारी आगबोटींत बसून जंजिऱ्यास आला. त्यानें आपल्याबरोबर पसार झालेल्या कैदीस आणिलें होतें. तीन दिवसपर्यंत चौकशी झाल्यानंतर साहेबानें सर्व हकिकत मुंबईसरकारास कळविली. खान साहेबांस दुष्ट व अन्यायाचीं कृत्यें केल्याचा दोष लागला. त्यांच्याकडून गव्हनर जनरलानें फौजदारी अधिकार काढून घेऊन तो इंग्रज सरकाराकडे वाटेल तितक्या मुदतीपर्यंत ठेवण्याचा ठराव केला. नंतर हॅवलाक साहेब जंजिऱ्यास येऊन त्यानें नबाब साहेबांस सांगितलें कीं, हिंदुस्थान सरकारनें लारकम साहेबांस पोलिटिकल एजंट नेमिलें

आहे, तो सर्व फौजदारी काम चालवील व त्याच्या खात्याचा सर्व खर्च तुह्मी द्यावा. तो तुमचें हित करील. तुह्मी त्याच्या सल्ल्यानें वागावें. तारीख ११ नोव्हेंबर इ. स. १८६९ पासून संस्थानांत पोलिटिकल एजंटाची नेमणूक झाली. मोरे येथील सरकारी बंगला त्यास राहण्यास दिला होता.

फौजदारी अधिकार पोलिटिकल एजंटाकडे गेल्यामुळें नबाब साहेबास फार वईट वाटलें. तेव्हां हाजी मिया टाणगें सरकारचा ठाणें येथील वकील यानें सांगितलें कीं, मी मुंबईस जाऊन एजंटाचें ठाणें उठवितों. नंतर तो मुंबईस निघून गेला, आणि सुमारें अडीच महिन्यांनीं सरकारांस मुंबईस नेण्याकरितां आगबोट पाठवून दिली. तींत बसून इ. स. १८७० च्या फेब्रुआरी महिन्याच्या १९ व्या तारखेस नबाब सरकार मुंबईस गेले व तेथून सर्व राज्यकारभारांचीं कामें चालवू लागले होते.

स्वारीच्या अवाढव्य खर्चाकरितां परभारा महालों महालींहून पैसा मुंबईस जात असे. त्यामुळें नोकर चाकर लोकांच्या दादण्या व पट्या ( नोकर लोकांच्या मुशाहिराच्या पैकीं कांहीं भाग. ) देण्याचा राहिल्यामुळें वाजवी मुदतीपेक्षां तीन महिने अधिक झाल्यामुळें ह्या मुशाहिऱ्याबद्दल नोकर लोकांचा फार

नेट लागला होता. एजन्सीची दोन महिन्याची नेमणूक देण्याची राहिली होती. खजिन्यांत पैसा शिल्लक नव्हता, तेव्हां शिद्दी सरदारांनीं शिद्दी सालपा फौजदार, व शिद्दी अबदुलकरीम हवालदार यांस नवाब साहेबांस आणण्याकरितां मुंबईस पाठविलें; परंतु एजन्सी उठविल्याशिवाय जंजिऱ्यास जावयाचें नाहीं, असा सरकारचा निग्रह असल्यामुळें ते आले नाहींत. किल्ल्यांतील पुष्कळ लोकांस सरकारनें कामावरून दूर केलें व कांहीं लोकांस कैद करून मुंबईस पाठवावें असा सक्तीचा हुकूम दिला. त्यामुळें लोकांचीं मनें बिघडून ते अगदीं अनावर झाले म्हणून त्यांच्या बंदोबस्ताकरितां मोकाशी लोकांचें लष्कर आलें, परंतु किल्ल्याचा दरवाजा बिथरलेल्या लोकांनीं बंद केल्यामुळें त्यास किल्ल्यांत जातां आलें नाहीं.

त्यावेळीं किल्ल्यांतील लोकांनीं दुसरा नवाब गादीवर बसविण्याचा निश्चय केला. शिद्दी हुशन सुभेदार व शिद्दी माहामुद शेखानी सुभेदार जंजिऱ्यांत गेला, आणि तेथील लोकांचा निग्रह पाहून शिद्दी अहमदखान यांस इ. स. १८७० सालीं मे महिन्याच्या २२ व्या तारखेस गादीवर बसाविलें. त्यावेळीं त्याचें वय ८ आठ वर्षांचें होतें. यांस गादीवर बसविल्यानंतर सर्व कारभार शिद्दी सरदार आपल्या म-

त्यानें चालवूं लागले, त्यावेळीं लारकम साहेब पोलिटिकल एजंट हा तेथें नव्हता.

ही गोष्ट शिद्दी इभ्राइमखान साहेब यांस मुंबईस कळतांच त्यांनीं इकडील सर्व हकिकत मुंबई सरकारांस कळविली. त्यावरून हवलाक साहेब, कमिशनर हफ साहेब, कुलाबा कलेक्टर लारकम साहेब पोलिटिकल एजंट व महमदखान दळवी हे सर्व आफिसर लोक लाढाऊ बोटींतून दारूगोळा व लष्कर घेऊन राजपुरीस आले. तेथें सर्व शिद्दी सरदारास बोलावून आणल्यानंतर एक राजा असतां दुसऱ्यास गादीवर बसविण्याचें कारण विचारिलें. त्यांनीं सांगितलें कीं, जो राजा रयतेस त्रास देतो, व आपला अधिकार योग्य रीतीनें चालवीत नाहीं, त्यास काढून शिद्दी सरदार दुसऱ्यास गादीवर बसवितात ही वहिवाट पूर्वीपासून चालत आली आहे. तेव्हां हवलाक साहेबानें सांगितलें कीं, मुंबई सरकारचा दुसरा हुकूम होईपर्यंत हें संस्थान आह्मी जप्तीस ठेवून आह्मी आपल्या तर्फे एक कारभारी नेमितों. तो मुरुडास राहून सर्व जमाबंदीचें काम पाहील. तुह्मी किल्ले कोठांतील कारभार चालवावा आणि वहिवाटीप्रमाणें तुमचे जे हक्क असतील ते तुमच्याकडे चालतील. या व्यवस्थेप्रमाणें संस्थानाचा कारभार तारीख १४ जून

इ. स. १८७० पासून पुढें सहा महिनेपर्यंत चालत होता.

नंतर हवलाक साहेबानें या सर्व हकिकतीचा रिपोर्ट मुंबई सरकारांकडे केल्यावरून त्यांनीं तारीख १८ आक्टोबर रोजीं असा ठराव केला कीं, शिद्दी सरदार राज्यकारभारांत वारंवार हात घालतात. सध्याच्या नबाबाचा आजा शिद्दी इभ्राइमखान यांस शिद्दी सरदारांनीं गादीवरून काढिलें होतें, परंतु इंग्रजी राज्य वरिष्ठ झाल्यापासून असें उदाहरण घडलें नाहीं. इंग्रज सरकारानें मान्य केलेला राजा राज्य करीत असतां त्यास काढून दुसऱ्यास गादीवर बसविण्याचा अधिकार कांहीं सरदारांस असल्याचें कबूल केलें तर मोठा घोंटाळा व दंगा फिसाद होईल. नबाबानें अधिकार दिल्याखेरीज शिद्दी सरदारांची राज्यकारभार करण्याचा बंदोबस्त करण्याची वहिवाट आहे, असें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. संस्थानच्या सर्व कामांचा जोखीमदार नबाब समजला पाहिजे. संस्थानांतील लोक नबाबास नाखूष आहेत. ह्या ह्मणण्याचा खात्रीलायक निर्णय करणें कठीण आहे. लारकम साहेबांस आपलें कर्तव्य कळलें नाहीं, ह्मणून त्यास असिस्टन पोलिटिकल एजंट मुंबईसरकारनें करून पोलिटिकल एजंटचा अधिकार कुलाब्याचा कलेक्टर

साहेब याजकडे दिला. नबाबानें खालीं लिहिलेलीं कलमें कबूल केल्यानंतर त्यास संस्थानच्या गादीवर बसवावें, असा ठराव हिंदुस्थानसरकारचा झाला तो येणें प्रमाणें:—

कलम १ लें.—कोणत्याही महत्वाच्या बाबतींत आह्मी इंग्लिश सरकारच्या वतीनें असण्याच्या पोलिटिकल एजन्टाचा सल्ला घेत जाऊं.

कलम २ रें.—पोलिटिकल एजन्सीबद्दल जो खर्च होईल तो आह्मी देऊं अशा खर्चाची रकम इंग्रजसरकार वेळोवेळीं ठरवील.

कलम ३ रें—पोलिटीकल एजंट व त्याचे मदतनीस यांस फौजदारी काम नीट रितीनें चालावें ह्मणून आह्मी योग्य मदत देऊं. त्यांनीं पाठविलेल्या खटल्याचा तपास करण्याकरितां ब्रिटीश सरकारच्या पसंतीनें एक माजिस्त्रेट नेमूं.

कलम ४ थें.—ब्रिटीशसरकार सांगेल तितके पोलीस ठेऊन त्यावर एक कामदार नेमूं, तो माजिस्त्रेटचा मदतगार समजला जाईल.

कलम ५ वें.—वसूल रेविन्यू कामें दोन्ही करावीं तीन झालीं तर कोणत्या रितीनें वागावें याविषयीं नि-

यम ठरवावे. हे नियम ब्रिटीशसरकाराने पसंत केल्यानंतर कायद्याप्रमाणें समजले जातील.

कलम ६ वें.—आमचे चिरंजीव शिद्दी अहमदखान यास विद्याभ्यासाकरितां एक शिक्षक ठेवावा व तो ब्रिटीशसरकारांस योग्य वाटेल तोंपर्यंत ठेविला जाईल.

कलम ७ वें.—शिद्दी हुशान जबर्ती व बंडांत सामील असलेल्या दुसऱ्या लोकांचे खटले चौकशीकरितां पोलिटीकल एजंटाकडे पाठविले जातील.

कलम ८ वें.—हाजी महमद ठाणगें याच्या वाईट मसलतीमुळें आह्मांस हल्लीच्या संकटांत पडावें लागलें ह्मणून त्यास नोकरींतून दूर करून कोणत्याही कारणानें जवळ ठेवणार नाहीं.

या प्रमाणें अटी लिहून दिल्यानंतर इ. स. १८७० मध्यें डिसेंबर महिन्याच्या २१ व्या तारखेस मुंबई सरकारानें आगबोट देऊन नबाब सरकारांस जंजिऱ्यास पाठविलें, आणि दोन दिवसांनंतर पूर्वी प्रमाणें मुलकी व दिवाणी कारभार त्यांच्याकडे दिला आणि पोलिटीकल एजंट हफ साहेब यानें शिद्दी सरदारांस कळविलें कीं, तुमचा कोणताही हक्क सरकारानें कमी केला नाहीं. फक्त एका राजास गादीव-

रून काढून दुसऱ्यास गादीवर बसविण्याचा अधिकार तुमच्याकडून दूर केला आहे.

खान साहेब गादीवर बसल्यानंतर त्यांनीं आपल्यास गादीवरून काढण्याच्या उद्योगांत जे लोक सामील होते. त्यांच्या नेमणुका बंद केल्या व त्यांच्याकडे असलेले खोती गांव परत घेतले. शिद्दी सरदारांनीं शिद्दी अहमदखान यास गादीवर बसविलें त्यावेळीं व पुढें संस्थान जप्तीस असतां त्यांच्याकडे जी सत्ता सोंपविली होती त्यावेळीं, जो खर्च झाला होता, त्याचा हिशोब मागितला, व त्यांच्या पैकीं कोणी किल्ल्याबाहेर जाऊं लागल्यास त्यांचे झाडे घेतले. ही त्यांची अप्रतिष्ठा झाली या कारणामुळें नबाब साहेब व शिद्दी सरदार यांच्यामध्यें वैमनस्य वाढलें. ह्मणून शिद्दी सरदारांनीं आपली सर्व हकिकत मुंबई सरकारांस कळविली. त्यावरून त्यांनीं डफ साहेबास या कामाचा तपास करण्याकरितां पाठविलें, त्यांनीं शिद्दी सरदाराजवळ सर्व हिशोब मागितले त्यांची यथायोग्यता पाहण्याकरितां नबाब साहेबांनीं वामनराव तानाजी सरदार यांस पाठविलें. एकंदर खर्च रुपये १३,८९३, झाला होता. त्यापैकीं वामनराव तानाजीच्या रुजवातीनें ३९५ रुपये खर्च योग्य ठरला. बाकी १३,४९७, रुपये खर्च योग्य

नसल्याकारणानें शिद्दी सरदारांपासून घेण्याचें ठरलें; परंतु शिद्दी सरदारांच्या नेमणुका व खोती गांव प्रथम सरकारानें घेतल्यामुळें ही रक्कम सरकारांस देण्याचें त्यांच्या जवळ साधन मुळींच नव्हतें. ह्मणून डफ साहेबानें कुलाब्याचा कलेक्टर ओव्हन साहेब यांस पाठविलें. सन १८७२ मध्यें ओव्हन साहेब जंजिऱ्यास आले व त्यानीं नबाब साहेबाच्या सल्ल्यानें व शिद्दी सरदारांच्या समजुतीनें नेमणुका ठरवून शिद्दी सरदारांच्या तक्रारी मोडून काढल्या. आणि केरो सदाशीव व विनायक नारायण चिटणीस आणि वामनराव तानाजी असे तीन परभु ह्या वेळच्या दरबारांत पुढारी असलेले काढून टाकिले.

इ. स. १८७२ मध्यें नबाब साहेब लार्ड नार्थब्रुकच्या दरबाराकरितां मुंबईस गेले. तेथें सचीनच्या नबाबापेक्षां यांचा मान ज्यास्त असतां त्यांच्या खालीं बसण्यास खुर्ची मिळाल्यामुळें त्यांस फार वाईट वाटलें. व त्याच वर्षी त्यांनीं सर्व परभु लोकांस आपल्या राज्यांतील सरकारी नोकरींतून काढून टाकलें आणि असा ठराव केला कीं, या लोकांस पुन्हां भविष्यांत कधीं सरकारी नोकरींत ठेवूं नये

इ. स. १८७५ मध्यें नबाब साहेब पुन्हां मुंबईस प्रिन्स आफ वेल्स यांस भेटण्याकरितां गेले. त्या-वेळीं तेथें त्यांचा चांगला आदरसत्कार झाल्यामुळें ते फार खुष झाले. याच सालीं नबाब साहेबांनीं तंबाकूच्या विक्रीवरील कर व समुद्रांतून जाणाऱ्या लोकावरील कर उठविला, तो अद्याप बंद आहे. मुंबई व जंजिरा यांच्या दरम्यान आगबोट सन १८७४ पासून चालू झाली.

इ. स. १८७६ च्या जानेवारी महिन्याच्या १७ व्या तारखेस नबाब साहेबाची शरिफा बिबी नांवा-ची पहिली बायको हरेश्वर येथें मरण पावली. तिचें शव राजपुरीस आणून दफनाविलें आहे. हिला बागबगीच्याचा फार शोक होता. त्याचप्रमाणें हल्लीचे नामदार बेगम साहेब यांस बोटानिकल, आग्रिकलचर बगीच्याचा फार शोक आहे. त्याप्रमाणें फुल शहर येथें पहाण्यासारखा बगीचा आहे. हरेश्वर येथील तिचा बाग पहाण्यासारखा आहे. ही मोठी धूर्त व शहाणी होती, फातिमा बिबी साहेबांवर ज्यावेळीं सैदा बाईनें भलभलती व्यर्थ कुभांडें रचलीं त्यावेळीं जंजिऱ्यात राहणें तिला ठिक न वाटून ती हरेश्वरास राहण्यास गेली.

---

१ हरेश्वर हें मोठें तीर्थाचें स्थान आहे, येथें हजारो तीर्थ-

इ. स. १८७७ मध्यें संस्थानांत दुष्काळ पडला तेव्हां लारकम साहेबानें संस्थानाच्या बाहेर धान्य जाऊं देण्याची सक्त मनाई केली. भाताचा दर प्रत्येक खंडीस ३० तीस रुपये ठरविला, व त्यापेक्षां जास्त दरानें विकण्याची सक्त मनाई केली. ज्याच्या जवळ धान्याचा पुरवठा होता त्यास वरील दरानें भात विकण्याची, व तसेंच शिकारीकरितां बाहेरील लोकांस संस्थानांत येण्याची बंदी केली, आणि सरकारी दास्तानांतून भात आणून संस्थानाच्या दुष्काळ पिडीत लोकांस वाटलें. नबाब साहेब व लारकम साहेबांनीं द्रव्यद्वारा ही मदत केली. नंतर हिंदु मुसलमान यांच्यामध्यें वाद्याचा संबंधानें तंटा उत्पन्न झाला. अबास अल्लीखान फौजदार यानें रमजान महिन्यांत मोहरमच्या पहिल्या तारखेपासून १२ व्या तारखेपर्यंत अदितवार व गुरुवार रात्रीं आणि शुक्रवारीं सर्व दिवस व प्रत्येक दिवशीं निमाज पढण्याच्या वेळीं मशिदीजवळ कोणत्याही प्रकारचें वाद्य वाजविण्याबद्दल सक्त मनाई केली होती, तसेंच एखादे घरीं लग्नकार्य असून तें घर जर मशिदीच्या जवळ असेल तर, घरांत सुद्धां वाद्यें वाजविण्याची परवानगी ठेविली नव्हती. त्यामुळें हिंदु लोकांस फार अडचण होऊं लागली. त्यावेळीं केरो सदाशीव

मुत्सद्दी यांनीं नबाब साहेबांस सांगून इ. स. १८७७ सालीं एक जाहीरनामा लाविला. त्या योगें हिंदु लोकांच्या वाद्यांसंबंधी बहुतेक अडचणी दूर झाल्या. फक्त मशिदीच्या समोर वाद्यें वाजविण्याची मनाई होती, परंतु या जाहीरनाम्यावरून अबास अल्लीखान फौजदार व गुलाम मोहिदीन परकर सर न्यायाधीश यांस वाईट वाटून त्यांनीं मुसलमान लोकांस दंगा करण्याची भर दिली. अमलदाराकडून अशी भर मिळतांच कांहीं दांडगे व अविचारी मुसलमान लोकांनीं कित्येक हिंदु लोकांच्या घरांत शिरून, मूर्ती फोडल्या आणि मारहाण केली. रमजान व भाद्रपद हे दोन्ही महिने एकेच वेळीं आले होते, हिंदु लोक गणपतीच्या मूर्ती पोंचवीत असतां, मुसलमान लोकांनीं मुरुडच्या बाजार पेठेंत मारहाण केली. या दंग्यांत जे गुन्हेगार होते, त्यांस योग्य शिक्षा मिळाली. आबास अल्लीखान व परकर यांस संस्थानांत नोकरी न देण्याचा पोलिटीकल एजंटानें ठराव केला, नंतर नबाब सरकारांनीं दोन्ही धर्माच्या पक्षकारलोकांस मान्य होतील असे नियम करून जाहीरनामा प्रसिद्ध केला.

इ. स. १८७७ मध्यें फ्रामजी खरशेटजी कुलाब्याचा पोलीस इन्स्पेक्टर, यांस दुसरा वर्ग माजिस्त्रेटचा

अधिकार असून त्याच्या इनसाफावर पोलिटीकल एजंटाकडे अपील होत असे. सर न्यायाधीशांची जागा कमी केल्यामुळें दिवाणी दाव्याचें अपिलें कारभाऱ्याकडे होत असत. यांस मुंबई सरकारचें विशेष सांगणें हें होतें कीं, हिंदु व मुसलमान यांच्यातील तंटे मोडून स्नेह करावा. आणि नबाब व त्यांचे आप्त (खानदान) यांच्यामध्यें जी द्वेषबुद्धि आहे ती काढून शिद्दी सरदारांचे जे योग्य हक्क असतील ते चालवावे आणि जंगलांच्या संरक्षणाकरितां चांगला बंदोबस्त ठेवावा. लारकम साहेब मरण पावल्यामुळें यावेळीं असिस्टंट पोलिटिकल एजंट पेन साहेब होता.

इ. स. १७७८ च्या मार्च महिन्याच्या १९ व्या तारखेस शिद्दी भाईबंद अथवा हबशी भाईबंद नांवाच्या लष्करी लोकांचा सरदार शिद्दी अंबर हा मरण पावला. त्याजकडे आरमाराकडील मुख्य अधिकाऱ्याची जागा असल्यामुळें त्यास शाहा बंदर ह्मणत.

इ. स. १८७२ च्या जानेवारी महिन्यांत २८ व्या तारखेस दोन प्रहरीं शिद्दी इब्राहीमखान साहेबांच्या पोटांत एकाएकीं वायूगोळा येऊन ते मरण पावले. त्यावेळीं त्यांचें वय ५१ वर्षांचें होतें. त्यांनीं

२९ वर्षे राज्य केलें, यास फातिमा बिबीच्या पोटीं शिद्दी अमहमदखान साहेब, सैदाबाईच्या पोटीं शिद्दी महमद बक्षी आणि शिद्दी अबदुल रहीम आणि नारंगीबाईच्या पोटीं हशना बिबीसाहेब याप्रमाणें तीन मुलगे व एक मुलगी आहे.

पूर्वीपासून अशी चाल आहे कीं, एखादा राजा मरण पावला असतां, दुसऱ्यास गादीवर बसवून नंतर मरण पावलेल्या राजाचे मय्यत दफनावित असत. ह्मणून किल्ल्यांतील लोकांनीं इंग्रजसरकारची संमती न घेतां शिद्दी महमदखान बक्षी याच्या पक्षाकडे बरेच लोक असल्यामुळें त्यास गादीवर बसविलें. सबब फिझलॅंड साहेबांनीं सर्व हकिकतीचा रिपोर्ट केल्यावरून ही बातमी पोलीटिकल एजंट बोझांकिट साहेबास समजतांच तो मुंबई सरकारच्या हुकमानें जंजिऱ्यास आला; आणि त्यानें सर्व शिद्दी सरदारांस बलावून सांगितलें कीं, हिंदुस्थान सरकारची मंजुरी आल्यानंतर नबाब कायम करण्यांत येईल, तोंपर्यंत संस्थानाचा सर्व राज्यकारभार असिस्टन्ट पोलिटिकल एजंट फिझलॅंड साहेब पाहतील. पुढें तारीख १० मे इ. स. १८७९ चा हिंदुस्थान सरकारचा ठराव झाला कीं, शिद्दी इभ्राहीमखान यांच्या मागें त्यांचा औरस पुत्र शिद्दी अहमदखान साहेब ह्यांस गादीचे

वारस मान्य केलें आहे, सबब या नबाबास राजकोटास राजकुमार विद्यालयांत विद्याभ्यास करण्याकरितां पाठवावें आणि संस्थानाची सर्व व्यवस्था हल्ली प्रमाणें नबाबास पूर्ण अधिकार मिळेपर्यंत असिस्टंट पोलिटिकल एजंट यानें चालवावी; व पोलिटिकल एजंटानें जंजिऱ्यास जाऊन शिद्दी अहमदखान साहेब यांस नबाब साहेबाच्या गादीवर योग्य समारंभानें बसवावें.

शिद्दी अहमदखान साहेब यांस गादीवर बसविण्याच्या समारंभाकरितां **बाझा क्युवेट** साहेब व **फिझलेंड** साहेब जंजिऱ्यास आले. त्यांनीं शिद्दी **अहमदखान** साहेब हे मुरुडास होते तेथून जंजिऱ्यांत जात असतां, राजपुरीस **सय्यद अबदुल रहिमान ऐद्रुस उर्फ गादीवाले मिया*** यांच्याकडे त्यास खाना मिळाला. नंतर ते जंजिऱ्यास गेले.

---

* इ. स. १७३२ मध्यें शिद्दी **हशन** यास गादीवर बसविला त्यावेळीं यांस 'गादीवाले मिया' हें नांव दिलें आहे. ह्मणजे शिद्दी सरकारामध्यें जो गादीवर बसेल तो याच्या कुटुंबांच्या पुरुषांनीं महमदी शास्त्राप्रमाणें क्रिया करून बसवावें, व यासाठीं यांस दोन गांव इनाम दिले आहेत. ते अद्यापि त्यांच्या वंशाकडे चालू आहेत. तसेंच सरकारास बसविण्याकरितां जी गादी तयार करितात, ती ही यांसच मिळते. त्या गादीवर बसून यानें परमेश्वराची भक्ति करावी असा रिवाज चालू आहे.

तेथें बक्षी मियाच्या हवेलींत समारंभाची सर्व व्यवस्था फ्रामजी कारभारी यानें ठेविली होती. सर्व शिद्दी सरदार, भाईबंद व मानकरी मुकादम आणि कामगार समारंभाकरितां आले होते. बोझा क्युवेट साहेबानें हिंदुस्थान सरकारचा ठराव वाचून दाखविल्यानंतर, इ. स. १८७९ च्या जून महिन्याच्या ११ व्या तारखेस बुधवारी तिसरे प्रहरीं शिद्दी अहमदखान साहेब यांस मोठ्या सन्मानानें गादीवर बसविलें. बादशाही रिवाजाप्रमाणें सैयद अबदुल रहिमान ऐदुशी यांनीं त्यांच्या अंगावर शाल व मोहर[1] घातली, नंतर पानसुपारी अत्तरगुलाब होऊन दरबार बरखास्त झाला.

पुढें थोड्या दिवसांनीं राजकुमार विद्यालयांत नबाब साहेबांस पाठविण्याकरितां फिझलैंड व फ्रामजी खरशेटजी कारभारी यांनीं नबाब साहेबांस राजपुरीस आणिलें आणि फिझलैंड साहेब पुढें

---

१ ही मोहर चांदीची किंवा सोन्याची नसते, परंतु पितळेची असून तिला चांदीची मूठ आहे. त्याला फासा असतो, त्या फाशांत रेशीम बांधून शाळ्याप्रमाणें अंगावर ठेवावयाच्या दोन बाजूला दोन त्यावर उर्दु भाषेमध्यें ' अलमगीर बादशाही गाजी, याकुबखान फिद्वी.' अशीं अक्षरें कोरलेलीं आहेत.

निघून मुरुडच्या बंदरावर आले. या दिवशीं संस्थानांतील गांवोगांवचे सुमारे दोन अडीच हजार लोक जंगल संबंधीं कांहीं तक्रारी कळविण्याकरितां, आणि बरसातीचे दिवस असल्याकारणानें नामदार नबाब साहेबांनीं राजकोटास आणखी तीन महिने जाऊं नये अशी विनंती करण्याकरितां मुरुडच्या बंदरावर जमले होते. तेथें फिझलेड साहेब येतांच कांहीं लोकांनीं आपले अर्ज साहेबांपुढें केले. त्यानें त्या लोकांस आपल्या बंगल्यावर येण्यास सांगितलें आणि आपण मेण्यांत बसून जाऊं लागला; त्यावेळीं लोकांनीं त्यांचा मेणा धरून अर्जाचा निकाल याचवेळीं करण्याची विनंती केली. परंतु साहेब मनांत अचकाऊन मेण्यांतून बाहेर आले व तसेंच आपल्या बंगल्याकडे जाऊं लागले. त्या बरोबर लोकही त्यांच्या पाठोपाठ जाऊं लागले. साहेबांची मडम बंगल्यावर होती. तिनें साहेबाच्या पाठिशीं पुष्कळ लोकांचा जमाव धांवत येत आहे, असें दुर्बिणींतून पाहून कांहीं दंगा फसाद असावा असें तीस वाटलें. त्यावरून तिनें ग्यारीशन शिपायांची पार्टी तेथें होती ती बंदरावर पाठविली. परंतु हे शिपाई साहेबांस मिळतांच त्यानें आलेल्या शिपायांस आपल्या बरोबर मागें नेलें.

नंतर जमलेले लोक बाजार पेठेंत नवाब साहेबांकडे आले. फ्रामजी खरशेटजी बक्षी मिया हे दोघे फिझर्लेंड साहेबाच्या बंगल्यावर गेले आणि फ्रामजी यानें साहेबांस सांगितलें कीं, लोकांचा दंगा करण्याचा विचार दिसतो. हें साहेबांस खरें वाटून तो आपल्या जवळ असलेली शिपायांची पार्टी व दुसरे पोलीस शिपाई बरोबर घेऊन मुरुडास आला, आणि येतांच त्यांनीं २९–३० लोकांस धरून कैद केलें. हें पाहून बाकीचे लोक पळून गेले. इनसाफ होऊन धरलेल्या लोकांपैकीं कांहींस शिक्षा झाली.

राजकुमार विद्यालयांत नवाब साहेबांनीं कांहीं दिवस घालविल्यानंतर रजेचे दिवस आले, तेव्हां मेकनाटन साहेबानें त्यांस सांगितलें कीं, तुह्मी या रजेंत जाफराबादेस जावें. जंजिऱ्यास गेलां तर मात्र तेथील लोक तुह्मांस पुन्हां येऊं देणार नाहींत. परंतु नवाब साहेबांनीं सांगितलें कीं, आमची येण्याची मर्जी आहे, आह्मी लोकांचें ऐकणार नाहीं. नंतर नवाब साहेब जंजिऱ्यास आले. त्या वेळचा देखावा अती रमणीय होता.

इ. स. १८७९ च्या जुलई महिन्यांत शिद्दी महमद् बक्षी यांनीं माजी नवाब साहेबाच्या खाजगी मिळकतीची वाटणी होण्याविषयीं व बक्षीगिरीचे हक्क

व शिरस्ते आपणाकडे चालण्याविषयीं मुंबई सरकारांकडे अर्ज केला. त्यावरून सरकारचा ठराव होऊन माजी नबाब साहेबांच्या खाजगी मिळकतीची त्याप्रमाणें वाटणी झाली. बक्षीगिरीचा किताब हल्लीचे नबाब साहेबांस मुलगा होईपर्यंत शिद्दी महंमद बक्षी यांजकडे राहील. पुढें संस्थानच्या वहिवाटीप्रमाणें तें काम व किताब शिद्दी महंमद बक्षी यांजकडे ठेवण्याचें किंवा नाहीं, हें नामदार नबाब साहेबांच्या खुशीवर आहे

इ. स. १८८० मध्यें जेम्स फरगुशन मुंबई इलाख्याचे गव्हरनर साहेब जंजिऱ्यास आले. त्यास १७ तोफांची सलामी दिली. बादशाही रिवाज प्रमाणें दरबार झाला त्यावेळीं गव्हरनर साहेब म्हणाले, पूर्वीपासून या सरकारांचें व इंग्रज सरकारचें दोस्तीचें नातें आहे. आम्हीं राजकोटास गेलों होतों, तेव्हां मेकनाटन साहेबानें आह्मांस असें सांगितलें कीं, नबाब साहेबांची बुद्धि फार तीव्र आहे, अभ्यास मनलावून करितात आणि सांगितलेली गोष्ट चांगली ध्यानांत ठेवतात. हे त्यांचे गुण व वर्तन पाहून आह्मांस फार आनंद झाला आहे, व ह्या खेपेस नबाब साहेब विद्यालयांतून आले ह्मणजे त्यांनी सहा

महिने मुशाफरी करितां पुण्यास राहावें असा आह्मी ठराव केला आहे.

इ. स. १८८२ च्या जानेवारी महिन्याचे १० व्या तारखेस सावनूरचे नबाब साहेबांची बहीण अहमद बीबी साहेब यांच्याशीं नामदार नबाब साहेबांची शादी ( लग्न ) झाली. ही बाई फार शांत स्वभावाची असून मोठी दक्ष होती. इ. स. १८८९ मध्यें ती निवर्तली.

इ. स. १८८३ मध्यें मार्च महिन्याच्या १२ व्या तारखेस नबाब साहेब पुण्याहून आल्यानंतर ते व सालमन साहेब असिस्टन्ट पोलिटीकल एजंट हे जॉईट ॲडमिनीस्ट्रेटर्सच्या नात्यानें काम पाहूं लागले. पुढें आठ महिन्यांनीं गव्हरनर साहेबांच्या हुकमानें क्राफर्ड, कमिशनर साहेब आणि किशर पोलिटीकल एजंट यांनीं येऊन आक्टोबर महिन्याच्या ११ व्या तारखेस नबाब साहेबांकडे त्यांच्या राज्यांतील सर्व अधिकार दिला. त्यामुळें असिस्टन्ट पोलिटिकल एजंटाचें ठाणें उठलें, आणि तेव्हांपासून नबाब साहेब सर्व अधिकार चालवूं लागले.

# भाग ४ था.

## उपसंहार.

| | |
|---|---|
| १ हल्लींच्या नबाबाची कारकीर्द. | ३ राज्यांतील खातीं. |
| २ ,, ,, राज्यपद्धति. | ४ सद्यःस्थितीची हकीकत. |

हल्लींचे नामदार नबाब साहेब यांचा जन्म, भाग ३ रा यांत दिला आहे; तरी पण या भागांत त्यांचें संक्षिप्त चारित्र देण्याचा विचार आहे.

नामदार नबाब साहेब शिद्दी अहंमदखान हे ता. ३१ आगष्ट इ. स. १८६२ रोजीं राजधानीं किल्ला जंजिरा येथें जन्मले. यांचे जन्मचरित्राचा वृत्तांत अलाहिदा पुस्तकरूपानें लिहीणें अवश्य आहे. या राजकुमार वीर पुरुषानें आपला अभ्यास इ. स. १८८१ मध्यें राजकुमारविद्यालयांत करून उत्तम बक्षिसें मिळविलीं आहेत. हे क्रिकेटचे उत्तम खेळाडु असून त्यांनीं बक्षिसेंही संपादन केलीं आहेत. यांस इंग्रजी, मराठी, परशीयन, गुजराती, आणि उर्दू अशा भाषा चांगल्या अवगत आहेत. मेजर सालमन साहेब आसिस्टंट पोलिटीकल एजंट यांजपाशीं नबाब साहेबांनीं जाईंट ॲडमिनीस्ट्रेटरचें काम कांहीं दिवस

चालविल्यामुळें, यांस थोडक्याच दिवसांत राजकीय कामाचें ज्ञान फारच चांगलें झालें आहे. यांचा स्वभाव शांत असून ते न्यायी व सहनशील असल्यामुळें रयतेस त्यांची कारकीर्द फार सुखावह झाली आहे. यांचें दुसरें लग्न मुंबई येथील हाजी हसनअल्ली फेजी यांचे कन्येशीं झालें. यांची पत्नी नामदार बेगम साहेब यांस इंग्रजी, परशीयन, तुरकी, मराठी, गुजराती आणि उर्दू भाषांचें ज्ञान चांगलें असल्यामुळें, व उभयतांसही विद्येची गोडी असल्यामुळें संस्थानाच्या रयतेस सुशिक्षणाचा मोठा लाभ होत आहे. इतकेंच नाहीं तर उभयतांचें आमोल्य गुण स्तुतीपात्र आहेत. येथें इंग्रजी हायस्कूल नामदार नबाब साहेबांनीं स्थापन केलें असून मराठी आणि उर्दू शिक्षणाच्या मुली व मुलांकरितां शाळाही सुरू झाल्या आहेत. ड्रॉइंग व कसरतीचे वर्गही सुरू असून विद्याखात्याचा खर्च सुमारें वीस हजारांवर दरसाल होत आहे. मराठी, उर्दू आणि इंग्रजी शाळांतून परिक्षेमध्यें विद्यार्थ्यांची संख्या चांगली पास होऊं लागली आहे. ही गोष्ट नामदार नबाब साहेबांस फार भूषणावह झाली आहे. यांस इंग्रज सरकारांतून पूर्वीप्रमाणें सर्व राज्यसत्ता सोंपली आहे, त्यामुळें संस्थानचा राज्य-कारभार त्यांच्या हातीं येतांच त्यांनीं न्यायाची स्वतंत्र

कोर्टें स्थापन केलीं आहेत, रेव्हिन्यु दफ्तरेंही उत्तम रीतीनें सुधारलीं आहेत आणि संस्थानाचा रेव्हिन्यु ऐनजिनसी होता, तो सर्व पाहणीकरून नक्त रुपये केला आहे. ह्या सर्व खात्यांची विल्हेवारी भाग १ यांत दिली आहे. ही सुधारणा त्यांनीं इतक्या दक्षतेनें व जलदीनें केली आहे कीं, त्यामुळें या संस्थानाचें उत्पन्न पूर्वी ठाण्याचे कले. कार साहेब यांच्या तपासांत १,७०,००० रुपयांचें ठरलें होतें, तें हल्लीं ५,००,००० पांच लक्ष रुपयांचें झालें आहे. पोलिस व जंगलखात्यांत सुधारणा चांगली झाल्यामुळें रयतेस आतां विनाकारण त्रास होत नाहीं. त्याचप्रमाणें अपराधी लोकांसही जेव्हांचे तेव्हां न्यायाचे कोर्टासमोर उभें करून इनसाफाअंतीं त्यांस योग्य शासन कायद्यांस अनुसरून मिळतें.

जंजिरा संस्थानचे मुख्य राजधानीस्थान किल्ला आहे. परंतु तेथें राहणें सोईवार नसल्यामुळें नामदार नबाब साहेब हे मुरुड शहरानजीक फुलशहर उर्फ अहंमदगंज नांवाचे ठिकाणीं एक राजवाडा बांधला आहे, तेथेंच हमेष राहतात. मुरुड शहरांत पूर्वी रोगांची वस्ती फार होती. हिंवताप, नारू, पक्षवायू हे विकारी रोग अतीशय होते. परंतु नामदार नबाब साहेबांनीं मुरूड गांवांतील अपकारक झाडोरा तोडून सडका बनविल्या आणि

इ. स. १८९२ सालीं मुरूड येथें 'विक्टोरीया ज्युबिली वाटर वर्क' या नांवाचें उत्तम डोंगरी पाणी गारबीहून आणिलें आहे. तेव्हांपासून या शहरांतील रोगांची वस्ती साफ नाहींशी झाली आहे. सर्व संस्थानांत सरकारांतून रस्ते बांधण्याचें काम चालऊन ठिकठिकाणीं मुशाफरांकरितां धर्मशाळा, विहिरी, तळाव बांधले आहेत, व मुख्य मुख्य गांवीं लोकलबोर्ड म्युनिसिपालिटीच्या कमेट्या स्थापन करून विद्यावृद्धीसाठीं लायब्ऱ्याही झाल्या आहेत. तसेंच व्यापाऱ्यांस व शेतकऱ्यांस उत्तेजन देत आहेत. ह्या संस्थानाचा कारभार ज्यांनीं वीस वर्षांपूर्वीं पाहिला असेल, त्यांना संस्थानांत झालेला फेरफार व एकंदर सुधारणा पाहून आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं.

नामदार नबाब साहेब आपलें काम वेळचेवेळीं पाहून रयतेस योग्य न्याय देत आहेत, या त्यांच्या कर्तव्यदक्षतेमुळें केसरे हिंद महाराणी सरकारांतून 'के. सी. आय. ई.' ही मानाची पदवी देण्यांत आली आहे. यांच्या चांगलपणाचे जितकें वर्णन करावें तितकें थोडेंच आहे.

नामदार नबाब साहेबांस शिकारीचा शोक फार असल्यामुळें वाघासारखीं रानटी व क्रूर जनावरें यांच्या बंदुकीच्या निशाणाखालीं आपला देह सोडीत आहेत. तेणेंकरून हबशांच्या राज्यांत रात्री व दिवसा मुशाफरी करण्यास लोक निर्भय झाले आहेत.

नाम. नबाब साहेबांवर रयतेचे फार प्रेम आहे, तसेंच तेही रैयतेसाठीं जास्त कळवळा बाळगितात. दुष्काळाकरितां हजारों गोणींची खरेदी करून लोकांस फुकट धान्य वाटलें. इतकेंच नाहीं, परंतु द्रव्य व वस्त्रेंही दिलीं. हिंदुलोकांच्या मयतांस अग्निदहन करण्याकरितां लांकडेंही देतात. कोणास घर बांधून देतात व अनाथांचें लग्न करून देतात व कित्येकांस द्रव्यद्वारें मदतही करितात. जाफराबादची प्रजा येथें आणून त्यांचें पोषणही करण्यांत आलें आहे. अशा ह्या दयाळू व विद्याभिलाषि नबाब साहेबांस परमेश्वर दीर्घ आयु–आरोग्य देवो, त्यांचा दिवसेंदिवस अधिक उत्कर्ष होवो व त्यांच्या रयतेस दीर्घकाळपर्यंत त्यांचा लाभ मिळो, असें इच्छून हा अल्प इतिहास येथें पूर्ण करितों.

समाप्त.